# नवभारत

वर्ष ६ वें ] फेब्रुवारी १९५३ [ अंक ५ वा



किंमत १ रुपया

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष सहावें
अंक पांचवा

# नवभारत

फेब्रुवारी
१९५३

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनी सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






# 'नवभारत', फेब्रुवारी १९५३

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचे लेख या वर्षीं मागील अंकांत आले असून, तेथें त्यांचा परिचय दिला आहे.—का. सं. ]

प्रा. डॉ. शं. गो. तुळपुळे एम्. ए. पीएच्. डी.—पुणें विद्यापीठांत मराठी विभागाचे प्रमुख. 'पांच संत कवि', 'महाराष्ट्र-सारस्वत : पुरवणी' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

प्रा. श्रीनिवास दीक्षित— कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजमध्यें तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

श्री. दा. गो. देशपांडे— मुंबईच्या 'टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस'चे पदवीधर. सध्यां हैद्राबाद येथें सरकारी मुद्रणालयाचे लेबर वेल्फेअर ऑफिसर.

सौ. कमल कामत बी. एस्सी.– पुणें येथील महिलासंघटनांच्या कार्यकर्त्या.

प्रा. गं. बा. सरदार— पुणें येथील 'ना. दा. ठा. वुमेन्स कॉलेज'मध्यें मराठीचे प्राध्यापक. 'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी', 'संतवाङ्मयाची फलश्रुति' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

प्रा. म. रा. दामले— पुणें येथील विद्यापीठांत व वाडिया कॉलेजांत तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. यांचें तत्त्वज्ञानविषयावरील निबंध या स्वरूपाचें एक इंग्रजी पुस्तक प्रकाशनाच्या मार्गावर आहे.

प्रा. भा. शं. भणगे— मुंबई येथील 'पोद्दार कॉलेज ऑफ कामर्स'मध्यें अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

श्री. का. शि. पाटील बी. एस्सी. (प्रथम श्रेणी)—हल्लीं पुणें विद्यापीठांत एम्. एस्सी. चा अभ्यास करीत आहेत.

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.
* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.
* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

डॉ. शं. गो. तुळपुळे

# यादवकालीन महाराष्ट्राचें महानुभावीय दर्शन : ४ :

[ शके १२०० च्या आगेमागें रचिलें गेलेलें 'लीळाचरित्र' आणि 'गोविंदप्रभुचरित्र' हे जे दोन महानुभावीय ग्रंथ, त्यांमधून यादवकालीन महाराष्ट्रीय समाजाच्या विविध अंगांचें दर्शन घडून, त्या समाजाच्या स्थितिगतीची कांहीं कल्पना करतां येते. प्रस्तुत लेखमालेंतून लेखकानें या दोन महानुभावीय ग्रंथांच्या आधारें यादवकालीन महाराष्ट्राची सामाजिक पाहणी करण्याचा प्रयत्न केला आहे. या लेखमालेंतील पहिले तीन लेखांक अनुक्रमें 'नवभारता'च्या जून (१९५१), जुलै (१९५१) व एप्रिल (१९५२) या अंकांतून आले आहेत. त्यांत जातिभेद, विटाळ, सामाजिक सुरक्षितता, अधिकार व अधिकारी, गुन्हे व शिक्षा, शेती व शेतकरी, व्यापार व व्यापारी, उद्योगधंदे, नाणीं, सण व सोहळे, स्त्रीजीवन, कलाकौशल्य, शिक्षण इत्यादीविषयीं तत्कालीन उल्लेखांचा विचार केला आहे. ]

## भुतेंखेतें

यादवकालीन समाजाच्या भुतांखेतांविषयींच्या कल्पना म्हाइंभटाच्या चरित्रग्रंथांतून न कळत पण उत्तम रीतीनें व्यक्त झाल्या आहेत. हा समाज भुताखेतांवर विश्वास ठेवणारा असल्यानें एखाद्यास ग्रह म्हणजे भूत लागलें असतां भूतबाधेवरील उपाय म्हणून त्याला खांबास जखडून वर तेल ओतणें, गुणिये म्हणजे मांत्रिक बोलावून त्यांजकरवीं मंत्रोपचार व औषधोपचार करणें व सर्व उपाय खुंटले असें पाहून शेवटीं त्या माणसास चक्रधरांसारख्या साधूच्या पायांवर घालणें या गोष्टी नित्याच्या दिसतात. पंचकोळाचार्य (ए. १९), सारंगपाणी (पू. ६), लक्ष्मीदेव (पू. १७२) व दाइंबा (पू. ११) यांच्या हकीगती या दृष्टीनें वाचनीय असून, त्यांत चक्रधरांसारख्या सत्पुरुषासमोर ग्रह उभा राहूं शकत नाहीं, हा समज सर्वमान्य दिसतो. स्वतः चक्रधरांनीं एका ठिकाणीं आपला भुताखेतांवरील विश्वास व्यक्त केला आहे. एकदां दाइंबा गांवीं परत जाण्यास निघाले असतां आज 'भूतचतुर्दशी' असल्यानें भुतें सैरावैरा हिंडत असून गांवोगांवीं त्यांना बळी दिलें जात आहे असें सांगून, चक्रधरांनीं दाइंबास मोडता घातल्याची हकीगत वाचावयास मिळते. यावर दाइंबानें 'आम्हीं गोसावियांयाचे : आम्हांसि काइ ?' असा आत्मविश्वास व्यक्त करतांच 'तयांच्या ( भुतांच्या ) ठाइं एकें सामर्थ्यें असत : तें तन्हीं एथौनिचि सिधी नेइजेति कीं गा' याप्रमाणें उत्तर देऊन चक्रधरांनीं त्यास निरुत्तर केलें आहे. देवदेवता व भुतेंखेतें आणि त्यांचें सामर्थ्य यांवरील चक्रधरांचा विश्वास जाणून घेण्याच्या दृष्टीनें ही लीळा महत्त्वाची आहे (उ. ११). अन्य ठिकाणीं त्यांनीं भूतबाधेवरील उपाय म्हणून पाणीभाताच्या तीन मुदा ग्रहावरून ओवाळून टाकणें व ज्या निंबाच्या झाडावर ग्रह राहतो त्या झाडास लाथ मारणें हे उपाय म्हणून सांगितले असून ते सफलहि झाले आहेत (पू. ६, उ. ६१). भुतांप्रमाणें घरांतून कधीं देवतांचें अस्तित्व मानलें जाई व त्या इतर कोणास घरांत वसति करूं देत नाहींत, या कल्पनेचीहि पकड त्या समाजाच्या मनावर असल्याचें दिसून येतें (पू. २३७).

भुताखेतांवरील या अंधश्रद्धेबरोबरच हा एक मानसिक भ्रम असावा या विचाराची जाणीव क्वचित् कोठें दिसते हें विशेष होय. रात्रीच्या वेळीं बैलाच्या डरकाळीसारखा आवाज कानांवर येणें, भालू भुंकणें, मुलास पाळण्यांत घालून झोके दिल्याचा आवाज ऐकणें इत्यादि प्रकार म्हणजे सत्य कीं सत्याभास या प्रश्नाचें उत्तर चक्रधरांनीं दिलेलें नसलें, तरी त्यांतील लोकभ्रमाची कल्पना स्पष्ट आहे (पू. ४५). तसेंच एकदां दाइंबा हे जोगेश्वरीस निघाले असतांना रात्रीच्या वेळीं वाटेंत त्यांना धुपें म्हणजे मेघाकृति दिसली व तें साधें धुपें आहे, भूत वगैरे कांहीं नाहीं हें कळून घेतांच त्यांच्या तोंडून 'मानुषें भए भए म्हणति










तें ऐसें ' असे उद्गार निघाल्याचें म्हाइंभट सांगतो, हें विशेष होय ( उ. ११ ). स्वतःच्या निर्भयते-चा पुरावा म्हणून स्मशानांत जाऊन खुंटी ठोकून येण्याची गोष्ट अलीकडील असली तरी मनुष्य-स्वभाव सर्व काळीं सारखा असल्यानें यादव-काळांतहि आपण भीत नाहीं हें दाखविण्या-साठीं म्हणून राणाइसेस चक्रधरांनीं रात्रीच्या वेळीं गांवाच्या वेशीस शिवून येण्यास सांगितल्याचें एका लीळेवरून कळतें. मात्र या प्रसंगीं राणाइसेस वेशीच्या पलीकडे ' बाबर झांटि : गुंजावर्ण डोळे : खांदावरि आगळ : तथा लोहाचा मुदगलु : उंच थोरु महाप्रचंडु ' असा एक ब्रह्मसमंध दिसल्याचें म्हाइंभट सागतो. हा मात्र लोकभ्रम वाटतो ( पू. ३२० ). साधेस अंधारांत ' झुंबडें ' किंवा ' मुरडें ' म्हणजे भुताकृति दिसणें हा प्रकारहि यां-पैकींच होय ( उ. १४८ ). तसेंच मृतानें स्वप्नांत येऊन भोजनेच्छा व्यक्त करणें व चक्रधरांसारख्या सत्पुरुषास जेऊं घातलें असतां त्या मृताचें समाधान होणें ही कल्पनाहि लोकभ्रमांतच जमा असून तिचे उल्लेख दोन ठिकाणीं आढळतात ( पू. ३०८; उ. ३७० ). लोकांची दिठी म्हणजे दृष्ट लागणें, त्यामुळें डोळे लाल होऊन तोंड सुकणें व ती दृष्ट वृद्ध स्त्रीकडून सात घरची ' कुहीट ' आणून उतरविणें हा लोकभ्रमाचा प्रकार प्रत्यक्ष चक्रधरांच्याबाबत घडलेला आहे ( पू. १४५ ). देवतांस अपशब्द बोलल्यानें ज्वरताप येतो ही कल्पनाहि चक्रधरांच्या काळांत रूढ असावी ( उ. १९३ ). देवदेवतां-बरोबर नवससायास ओघानेंच येतात. गोविंद-प्रभूच्या चरित्रांत एका प्रसंगीं त्यांना मूत्रावरोध झाला असतां मूल सुटावें म्हणून सात वेळ उंबरा ओलांडणें किंवा तत्सम इतर कांहीं तोडगे यांनीं कांहीं होईना तेव्हां त्यांनीं रिधपुरांतील वाजेश्वरास ' खीच-पुरिया ' चा नवस केल्याची हकीगत आली आहे ( गो. १३४ ). तसेंच एक स्त्री आपल्या शेतांत जोंधळा चांगला पिकून घरास रास यावी या हेतूनें गोविंदप्रभूस ' ठेटरीं ' करून घालण्याचा नवस करतांना आढळते ( गो. १५० ). सर्पदंश व त्यावरील मंत्रोपचार यांची माहिती यादवकालांतील समाजास होती असें उत्तरार्धांतील वाडेगांवच्या माळ्याच्या हकीगतीवरून वाटतें ( उ. १० ). शकुन-अपशकुन या कल्पनाहि दृढमूल असून महादेवराव यादवासारख्या राजानें गमनसमयीं पाटाचा हत्ती मेल्याचा अपशकुन मानून चक्रधरांच्या दर्शनास जाण्याचा बेत पुढें ढकलल्याची आठवण म्हाइंभटानें सांगितली आहे ( पू. ८८ ).

## खेळ

चक्रधर व गोविंदप्रभु या दोघांचीहि वृत्ति पोरांत पोर व थोरांत थोर अशी असल्यानें त्यांच्या आठवणींतून तत्कालीन खेळांची माहिती मिळूं शकते. चक्रधरांच्या चरित्रास प्रारंभच ' सारीच्या जुवा ' नें म्हणजे सारीपाटाच्या द्यूतक्रीडेनें झालेला असून, त्यांच्या पूर्वायुष्यांतील लीळांत जूं, जुआरी, जुआठा, जुगदानी, हार-जीत इत्यादि द्यूतक्रीडा-विषयक उल्लेख सहजच येतात ( ए. ६, १३ ). पुढें उत्तरार्धांतहि एका ठिकाणीं चक्रधर सारीपाट खेळल्याचें वर्णन आढळतें, तें असें : " मग सारिवटु मांडिला : सारी मांडिलिया : गोसावी श्रीकरीं फासे घेतले : घेत खेवोंचि जाणितले : गोसावी सारी खेळों जाणति : गोसावी उठाउठी तीनी फळीं जितलीं : " याच लीळेंत गाइतेयाचा मुलगा हरि नाएक यानें सारीपाटांत जुवारू महादेवराव यास जिंकल्याचा उल्लेख येतो ( उ. ३१६ ). बैठ्या खेळांपैकीं दुसरा उल्लेख कवड्यांच्या खेळाचा असून हा खेळ चक्रधर सारंगपंडिताची मुलगी धानाई हिच्याशीं खेळल्याचें वर्णन आढळतें. त्यांतील ' कवडे चालणें ' हा वाक्प्रचार चिंतनीय आहे ( पू. १६ ). चिंचोऱ्यांचा म्हणजे चिंचो-क्यांचा खेळ हाहि एक बैठा खेळ असून तो लहान पोरांना प्रिय दिसतो. या खेळांत चिंचोके घांसून त्यांस ' धामें ' म्हणजे डोळे पाडीत व ज्याच्या धाम्या वर पडतील तो इतरांचे चिंचोरे जिंके ( गों.१३ ). तिसरा बैठा खेळ ' तारांगुळी 'चा. या खेळाचें बैदुलांच्या किंवा गोट्यांच्या खेळांशीं साम्य असून कधीं तो पोफळांनीं म्हणजे सुपाऱ्यांनींहि खेळत असें दिसतें ( उ. २७५ ). ' भावै 'च्या खेळाचा नुसता उल्लेख मात्र असून तो खेळतांना चक्रधरांनीं डोक्यावर पानें, फुलें, मोहोर व निंबोळ्या यांची










'वेठी' म्हणजे वेष्टन किंवा हार चढविल्याचें वर्णन आढळतें (उ. २८४). मैदानी खेळांचे उल्लेख अनेक असून त्यांपैकीं 'खडखांबुल' नांवाचा खेळ अतिशय लोकप्रिय दिसतो. खांब धरून त्याभोंवतीं फिरण्याच्या या खेळाचें 'खांबोळी' नांवाच्या अजूनहि प्रचारांत असणाऱ्या खेळाशीं विलक्षण साम्य आहे (पू. ३१; गो. २१, ९९). दाबादाबीचा आणि हाणामारीचा अशा दोन खेळांचें वर्णन मौजेचें असून त्यांपैकीं पहिल्यांत एकमेकांस रेटीत एकमेकांच्या बलाबलाची पारख केली जाई (उ. १०३) व दुसऱ्यांत एकाच्या अंगावर सारेजण तुटून पडत व 'चावणें-बोरपणें' वर्ज्य असलें तरी 'भलतेंणें भलतेथ' हाणण्याची मोकळीक असल्यानें या झोंबाझोंबींत लाथाबुक्क्यांची देवघेव खूपच होई. नागदेवा-सारख्या 'खंडीविखंडी झुंजणाऱ्या' पठ्यास चक्रधरांनीं या खेळांत चीतपट कसें केलें तें वर्णन मनोरंजक आहे (उ. १३८). 'रानभेरी'चा खेळ हाहि एक मैदानी खेळ असून त्यांत ज्यावर 'दाही' म्हणजे डाव देई त्याच्या पाठीवर इतर खेळाडू क्रमाक्रमानें आरोहण करीत व तो त्यांना पाठीवर घेऊन सीमेपर्यंत धांव घेई. हा खेळ मुख्यतः गोपाळगड्यांचा म्हणजे गुराख्यांच्या पोरांचा दिसतो (ए. ३३). उत्तरार्धांतील एका लीळेंत धांवण्याच्या शर्यतीचें वर्णन आलेलें असून त्यांतील 'भो' म्हणजे भोज्या किंवा सीमान्त चिन्ह ही कल्पना अद्यापिहि रूढ आहे (उ. ८५). 'होडेचा गुंडा' म्हणजे दगडफेंक किंवा दगड सर्वांत लांब कोण फेंकतो, हा खेळहि उल्लेखनीय असून चक्रधर तो नागदेवाशीं पैज लावून खेळले आहेत (उ. १७७). गोविंदप्रभुचरित्रांत गोपाळ-गड्यांच्या आणखी एका खेळाचा उल्लेख आला असून त्यांत हे गोपाळ डोक्यास कांबळ्याची 'दौडी', अंगास श्रीखंडाची किंवा नील-खड्यांची उटी व हातीं काठी अशा थाटांत खळ्यांत उभे राहून हातांतील काठी अंगाभोंवतीं गरगर फिरवीत 'पाडकीया पोरा दुधु घालीन' असें म्हणून खेळत असल्याचें वर्णन आहे. या खेळाचें नांव मात्र कळत नाहीं (गो. १४४). 'कोलदांडू' च्या किंवा विटीदांडूच्या खेळाचें वर्णन अधिक स्पष्ट आहे. आपल्या शिष्यांस या खेळाचा 'सराव' देणारा 'राजगुरु', त्याच्या हातांतील 'कोलु' म्हणजे दांडू घेऊन 'बद करून' घाव म्हणजे टोला हाणणारे चक्रधर व 'घाएखंडी' म्हणजे प्राणघातक अशा रामटोल्याची सूचना इत्यादि उल्लेखांवरून या खेळाच्या तत्का-लीन स्वरूपाची कांहीं कल्पना येईल (पू. १२९). 'लपंडाही' किंवा लपंडाव हा खेळहि तेव्हां आजच्याप्रमाणेंच खेळला जाई असें दिसतें (गो. १२). लीळाचरित्रांत उल्लेखिलेला 'जातिअंधा'चा खेळ मात्र आज अपरिचित वाटतो या खेळांत एकजण आपल्या डोक्यावर दोन्ही हात घट्ट पकडून उभा राही व दुसरे दोघे त्याच्या दोन हातांना लोंबकळले म्हणजे तो त्यांना भंवरी देई म्हणजे गरगर फिरवी. या क्रियेंत दोघांपैकीं ज्याचा भार जड त्याचे हात सुटून तो खालीं पडे व मग त्याच्यावर डाही म्हणजे डाव येऊन तो दुसऱ्या दोघांना गरगर फिरवी. जात्यंध माणसास बाहुबळ इतरांहून अधिक असतें या कल्पनेंतून वरील खेळ उद्भवलेला दिसतो (उ. ३२४). जलक्रीडांपैकीं पोहण्याच्या उल्लेख एका ठिकाणीं असून त्यांतील सांगड बांधणें, कासेस लावणें इत्यादि वाक्प्रचार अजूनहि वापरांत आहेत (उ. ७९). पाटांत शिरून एकमेकांवर पाण्याचा मारा करण्याचा किंवा 'पाट उडविण्या'चा खेळ हीहि एक तत्कालीन जलक्रीडाच म्हटली पाहिजे (पू. १०२). थाळे किंवा तांब्ये घेऊन एकमेकांवर जलसिंचन करणारे 'सिंपणेकार' व त्यांचें 'सिंपणें खेळणें' या दृष्टीनें उल्लेखनीय आहे (उ. १८१). तसेंच खेळ म्हणून नाहीं, तरी हातीं काठी घेऊन 'खें खें' करीत घोडाघोडा खेळणाऱ्या चक्रधरांच्या पूर्वाश्रमींच्या लहान मुलाची बालक्रीडा, पोरखेळ म्हणून का होईना, प्रेक्षणीय आहे (उ. ११७).

## शिकार

हाहि एक खेळाचाच प्रकार असल्यानें त्याविषयीं येथें लिहिणें अवश्य आहे. लीळाचरित्राच्या एकांकांत एका ठिकाणीं पारध्यांनीं सोडलेला










'होडेचा' म्हणजे पैजेचा ससा व त्यामागें धांवणारीं कुत्रीं यांचा उल्लेख असून त्या सशास आसरा देणाऱ्या चक्रधरास अनुलक्षून 'हा होडेचा ससा जी : याकारणें सूरिया काढणीया होती जी : हा सोडावा जी' असें त्या पारध्यांनीं म्हटल्याचें म्हाइंभट सांगतो. त्यावरून तत्कालीन पारध कशी काय चाले याची कांहीं कल्पना येते (ए. २३). दुसऱ्या एका लीळेंत व्हासी पक्षिणी व तिचीं पिलें आणि तिनें केलेली पारध याविषयीं उल्लेख आले आहेत (ए. ४३). तसेंच बाजारपेठेंत लागलेली दोन म्हैशांची 'तडवातडवी'ची म्हणजे अटीतटीची झुंज पाहण्यासारखी असून तेव्हांहि ती माणसांनीं माळवधांवर चढून पाहिली आहे (ए. ७०). पूर्वार्धांत एका ठिकाणीं महादेवरायाच्या राखीव रानांतून एक 'सोरु' म्हणजे डुकर निघाल्याचा उल्लेख येतो, त्याअर्थीं मृगयेसाठीं राजे रानें राखून ठेवीत एवढें समजतें (पू. ५८). उत्तरार्धांतील एका लीळेवरून, विशेषतः 'हें राखियेचें रान' या चक्रधरांच्या वाक्यावरून वरील विधानास बळकटी येते (उ. ५८).

## रोग व त्यांवरील औषधोपचार

रोग्याचें पथ्य व त्याची शुश्रूषा यांचे दोन उल्लेख आढळतात (ए. ३५, उ. १५६). अशक्तास पथ्य म्हणून घाटा करीत (गो. १७१) व ज्याची दीपनशक्ति मंद झाली आहे अशा रोग्यास तीन वर्षांच्या जुन्या 'तांदळाचें सीत' देत (पू. २३८, उ. ७४). अशक्तास वाहून नेण्यासाठीं 'खाट-दांडी' म्हणजे आंत निजतां येईल अशी पालखी करण्याची प्रथा असावी असें बाइसाच्या हकीगतीवरून दिसतें (उ. ३५७). पचनाच्या दृष्टीनें पाण्याचे 'हळु' म्हणजे हलकें व जड असे दोन प्रकार होते (गो. १३०). कानसुलें फुलणें ही वार्धक्याची खूण समजली जाई (उ. ३८०). आई न जेवल्यास तिचें दूध तिच्या लेकरास कडू होत असल्याची कल्पना दिसते (गो. ९१). तसेंच फार तूप खाल्ल्यानें ढुसी किंवा मोडशी होते असा समज दिसतो (गो. १७८). नाना प्रकारचे रोग व त्यांवरील उपचार यांविषयीं बरीच माहिती या दान चरित्रग्रंथांतून मिळते. ज्वर येणें, खोकला लागणें, खतें-खांडुकें होणें, व खरूज आणि कुष्ट लागणें इतक्या रोगांचा उल्लेख एका लीळेंत येतो (गो. ११५). पैकीं नऊ लंघनें पडूनहि न हटणारा ज्वरताप चक्रधरांच्या चरणोदकानें नाहींसा झालेला दिसतो (उ. ७४). थंडीनें दांत खटखटतात त्यावर सपाटून शेक देण्याचा उपाय होता (उ. १४). पण शीतजन्य वातविकारानें जो दीर्घकाळ 'खोडी-मोडी' म्हणजे जर्जर होऊन पडला आहे व उश्यापायथ्याला शेगड्या, अंगांत दोनदोन आंग्या, त्यावर पासोडी आणि वर जाडीचें म्हणजे कांबळ्याचें कोंगट–इतकें करूनहि ज्याची थंडी जात नाहीं अशा रोग्याचा वात एका चक्रधराच्या कृपेनेंच जाई असें पातु नायकाच्या कथेवरून कळतें (पू. २३७). वायुविकारामुळें जिला बारा वर्षें अन्नपाणी जाऊं शकलें नाहीं अशा एका स्त्रीची कथाहि अशीच आहे (ए. २४). अमरी आणि राख यांच्या सेवनानें कुष्ठरोगाचें प्रतिबंधन होईल, पण या उपायानें तो समूळ नष्ट होणार नाहीं असा अभिप्राय चक्रधरांनीं एका ठिकाणीं दिला आहे (उ. १६५). कोड व दादु या दोन रोगांचा उल्लेख अन्यत्र असून 'आधींच अज्ञान : वर लागलें अन्यथा ज्ञान' अशा प्रसंगीं 'जैसी कोडावरि दादु' याप्रमाणें दृष्टान्तरूपानें तो उल्लेख आलेला आहे. 'गंडस्योपरि पीटिका' या संस्कृतांतील सुभाषिताच्या धर्तीवरील ही मराठी म्हण चिंतनीय आहे (उ. ४०१). खरजेवरील उपचार म्हणून एक प्रकारचें तेल अंगास लावून 'बोतपली' म्हणजे उन्हाची तिरीप अंगावर घेणें असा उल्लेख एका लीळेंत येतो (उ. १५). हात अवटळल्यास तो गळ्यांत बांधण्याची व पायांस तिडका लागल्यास पाय गव्हाच्या धुगऱ्यांनीं शेकण्याची प्रथा असावी (उ. २७०, २९८). जिव्हारोगांत जीभ तोंडाबाहेर निघे व तिला साकोडे आणि मुंग्या लागत. हा रोग असाध्य समजला जाई असें काउळगांवच्या माळिणीस तो झाला असतां तिच्या नातलगांनीं तिला एकवीरेच्या देवळांत आणून टाकलें होतें यावरून वाटतें (उ. ५९). 'मुखपाक' म्हणजे तोंड येण्यावर मात्र कांजी उकळून तिच्या गुळण्या करणें हा एक उपाय दिसतो. (गो. ९४). पोटां-

तील वायूवर व्यायाम हा उपाय सांगितला आहे हें विशेष होय (उ. १०). आरें म्हणजे गळूं व आरुखे (?) या दोन रोगांचे उल्लेख दोन ठिकाणीं आढळतात, पण त्यावर उपाय सांगितलेला नाहीं (उ. ३६, २४६). गोंवर हा रोग संसर्गजन्य असल्याची जाणीव असावी; कारण भुतानंदे ही आपल्या नातवंडापाशीं निजल्यावर त्याचा ज्वर तिला आला अशी हकीगत म्हाइंभट सांगतो. पण त्यावर चक्रधर तिला कोल्हापुरास कां पाठवितात तें कळत नाहीं (उ. १६२). भटोबासास एकदां 'केसतोड' झाला असतां चक्रधरांच्या सांगण्यावरून त्यानें तेथें पाणीकापड म्हणजे ओलें फडकें बांधलें व रोग बरा झाला असें एक लीळा सांगते (उ. १९७). उदरव्यथेंत पेंडाळु नांवाचें फळ वर्ज्य मानलें जाई व उपचार म्हणून पोटास कोरडा शेक देत (उ. ३६८; गो. ८७, १४९). एकदां एकाचा बाहेर निघालेला डोळा पुनः जागच्या जागीं बसवून चक्रधरांनीं त्यावर आपल्या मुखांतील विड्याची पिंड बांधली व तो बरा झाला ही लीळा चमत्कारांच्या सदरेंत जाईल (ए. ३६). केळीं खातांना दोन दोन केळ्यांच्यामध्यें त्यांची साल खावी; कारण तसें न केल्यास पोटांत केळ्यांचा थर बसून त्यामुळें पोटशूळ उपजेल हें चक्रधरांचें सांगणें मात्र पटण्यासारखें आहे (उ. १९०). मूत्रावरोध किंवा 'मूत्र गुंतणें' यावरील त्यांच उपाय मंत्र-तंत्राच्या स्वरूपाचे आहेत. अशा प्रसंगीं ते सात वेळां उंबरा ओलांडतात, लहान मुलांकरवीं खडे घालवितात व त्यानें मूत्रावरोध नाहीसा होत नाहीं असें पाहून आबाइसेस वाजेश्वराला 'खीच-पुरियां' चा नवस करण्यास सांगतात (गो. १३४). सर्वज्ञ चक्रधर 'सकळ वोखदी' जाणत यांत कांहीं आश्चर्य नाहीं; पण या औषधी सत्रसिंग नांवाच्या टेकडीवर आहेत व रामायणांत हनुमंतानें लक्ष्मणासाठीं उचलून नेलेल्या द्रोणागिरीचें वाटेंत पडलेलें एक डिखळ म्हणजेच सत्रसिंग होय इत्यादि कल्पना मात्र पारंपरिक स्वरूपाच्या आहेत (उ. ४५५). गोविंदप्रभु अति खादाड होते हें आपण मागें पाहिलेंच. त्यामुळें शेवटीं त्यांना 'ग्राणी' म्हणजे संग्रहणीचा विकार जडला व त्यांतच त्यांचा अंत झाला. संग्रहणीस 'बाहिरतीचा उपद्रव' असें म्हणत. कारण उघड आहे (गो. ३२२).

### शिव्या

समाजांत रूढ असणारे अपशब्द किंवा शिव्या हेंहि एक सामाजिक दर्शनच आहे. चक्रधरांची शिष्यमंडळी व स्वतः गोविंदप्रभु यांच्या तोंडच्या शिव्यांवरून तत्कालीन समाजजीवनाचें हें अंग कळण्यास मदत होईल. स्त्रियांच्या तोंडीं स्त्रियांस अनुलक्षून 'लाव' (पू. २९४) व 'रांड' (पू. २९८) या दोन शिव्या विशेष प्रमाणांत आढळतात. 'कपाळीं घाल', 'तुझें मूत ओलांडल्यास कावरें लागेल' (उ. ४६७), 'निसंतान होईल' (उ. ४५९), व 'सर्डी पड रे' (उ. १२१) हीं शिवीवजा वाक्येंहि स्त्रियांच्याच तोंडीं घातलीं आहेत. 'घागरा बांधणें' हा वाक्प्रचार एकाद्याची हजेरी घेणें किंवा त्यावर तोंडसुख घेणें या अर्थानें लीळाचरितांत अनेक ठिकाणीं आढळतो (उ. २८, १३६). तो ज्या शिवीवरून रूढ झाला ती शिवी विशेषतः बाइसेच्या तोंडीं ऐकूं येते. 'मर मर पोरा : तुझिये मढा बांधे घागरा : जाए मसण वेन्हीं टूं टूं करीत' याप्रमाणें हीं शिवीचीं वाक्यें असून प्रेत वाहण्याच्या तिरडीस घागऱ्या किंवा घुंगुरें बांधण्याच्या तत्कालीन चालीवरून ही शिवीवजा म्हण प्रचारांत आली असावी असें वाटतें (पू. ३७२; उ. १०९). 'ढोरें राखा हो' या वाक्प्रचाराची कथा कांहींशी अशीच असून 'तुम्हांस बरें-वाईट यांतील फरक कळत नसल्यानें तुम्ही ढोरें राखण्याच्या लायकीचे आहां' या अर्थानें हें शिवीवजा वाक्य मुख्यतः चक्रधर व नागदेव यांच्या तोंडीं अनेकदां येतें (उ. ६६, १९६, ३१७, ३५३, ४६२). गोविंदप्रभूस तर शिव्या देण्याची खोडच असून त्यांच्या तोंडून अनेक तत्कालीन शिव्या ऐकूं येतात. पैकीं 'आवो मेली—मेला जाए' ही त्यांची अत्यंत आवडती शिवी असून ती जवळ जवळ प्रत्येक लीळेंत एकदां तरी येतेच. तसेंच 'रांडमुंड खापरखांड' व 'दासी—पडदासी, मोसारी' या दोन शिव्याहि त्यांना फार प्रिय दिसतात (गो. १३७, ३१७, ३२१). 'बोडी, बोचकवडी, पंचवकडी'








या शिव्याहि त्यांच्या तोंडीं आल्या आहेत (गो. १४०, १४१, १४५). 'मर तूं' हा शिवीवजा वाक्प्रचारहि रूढ दिसतो (गो. १७९). तसेंच 'फेंदी, खोडी, व दर्भेयाची दर्भी' या शिव्याहि गोविंदप्रभूच्याच तोंडीं असून त्या कांहीं शारीरिक व्यंगांच्या निदर्शक असाव्या असें वाटतें (गो. १२१). तत्कालीन शेतकऱ्यांच्या जीवनांतील एका शिवीवजा वाक्प्रचाराचा उल्लेख लीळाचरित्रांत सहज येऊन गेला आहे. हा वाक्प्रचार 'था भोरडिए' असा असून गोफण चालवून पिकाची राखण करतांना म्हणजे सोंकरतांना तो शेतकऱ्यांच्या तोंडीं असावा असें दिसतें (उ. ७).

## चालीरीती

यादवकालीन महाराष्ट्रांतील समाजाच्या चालीरीती पाहतां त्या आजच्याहून विशेष निराळ्या असलेल्या दिसत नाहींत. भूतबाधेवरील उपाय म्हणून अंगावरून पाणीभात ओंवाळून टाकण्याची रीत तेव्हांहि होती (पू. ६). राजा, गुरु व देवता यांना पाठ देऊन बसूं नये हा संकेत यादवकाळांतहि रूढ दिसतो (पू. १९). उलट राजघराण्यांतील कोणी पुरुष साधूच्या दर्शनास आल्यास तो त्याची भेट 'वेलें' म्हणजे सेवकांचें करें करून त्यांत घेई (गो. ९९). समाजांतील सधन लोक आपली श्रीमंती दाखविण्यासाठीं पालखींत बसून आसूंची म्हणजे सोन्याच्या नाण्यांची थैली झोळीत येजा करीत (उ. १८८). समाजांत आर्य, आर्यनागर व नागर अशा तीन प्रकारच्या संस्कृति असून आंगीटोपरें करणें ही नागरत्वाची खूण समजली जाई (उ. २७२). धान्याची सुबत्ता व्हावी या भावनेनें 'गृहप्रवेश'-समयीं चक्रधरांसारख्या साधूस जोंधळ्याचा टिळा लावण्याची रीत होती (उ. २१२). आठवणीसाठीं खरोखरच पदरास गांठ देत (उ. ८९). पायांत मोडलेला कांटाहि कांट्यानेंच काढीत (उ. १४९). आपलीं भांडीं कोणतीं तें ओळखतां यावें म्हणून भांड्यांवर 'वोळखण' म्हणजे आपल्या नांवाची खूण करण्याची प्रथा यादवकाळींहि दिसून येते (उ. २७२). बाहाणा नरम व्हाव्या म्हणून त्यांस लोणी लावीत (उ. १२१) व प्रवासांत बरोबर पाथेय म्हणून पोळ्या करून घेत (उ. ४६०). उभ्यानें कांहीं खाणें असभ्य समजलें जाई (उ. १८). शेंडीस गांठ देण्याचीहि प्रथा होती (उ. ७). 'भाखेचें पोफळ' व 'आंगुळिया दिष लेखणें' या दोन वाक्प्रचारांवरून त्यांमागील चालीरीतीहि सहज कळून येतात (उ. १, २). रोजचें पंचांग किंवा 'तीथवार' जाणविण्याचें काम उपाध्यायाकडे असे (पू. ३५२). शरमेनें भुईवर रेघा काढून स्वतःचा मनोभाव व्यक्त करण्याची मानवी मनाची लकब त्या काळांतहि व्यक्त झालेली आहे (उ. १०९). मुलगा होणें ही एक अभिमानाची गोष्ट समजली जाई व तो अभिमान मिशीस 'आटु' म्हणजे पीळ देऊन व्यक्त केला जाई (उ. ४०६). गौरवर्ण प्राप्त व्हावा म्हणून हळदीनें उटण्याची पद्धति रूढ होती (पू. २४). मुलगी वयांत आली म्हणजे तिला न्हाऊन उटून शृंगारसाज केला जाई (पू. २३). बालविवाह रूढ असून लेकीच्या बाळंतपणास आईनें जाण्याची प्रथा होती (उ. ११७). बाळंतपणांतील विधि स्थूलमानानें आजच्याप्रमाणेंच असलेले दिसतात (गो. ७२, ९१). लहान मुलास चक्रधरांसारख्या सत्पुरुषाच्या पायांवर घालण्याची रीति होती (उ. ३०६). पांच सुवासिनींत मानमान्यता असणें हें स्त्रियांच्या बाबतीत सौभाग्यचिन्ह समजलें जाई (उ. २९), व 'हातरीतणें' म्हणजे वैधव्य येणें हा दैवदुर्विलास मानला जाई (पू. ७१). जांवयाचा मानमरातब करण्याची प्रथा त्याहि काळांत रूढ होती; इतकेंच नव्हे, तर त्यावरून 'जांवई' हा साभिप्राय असा शब्दप्रयोग होऊन बसला होता (गो. २०७). बहिष्कृतास मात्र गोत्राकुटुंबापासून वेगळा करून त्यास बाजूला एका तिवईवर निराळ्या थाळींत जेऊं घालीत असें दिसतें (पू. ११).

(अपूर्ण)








प्रा. श्रीनिवास दीक्षित

# मी 'मटिरिआलिस्ट' कां नाहीं ?

माझे कांहीं विद्यार्थि-मित्र मार्क्सपंथीय आहेत. अर्थात्, ते स्वतःला 'मटिरिआलिस्ट' म्हणवितात. त्यांपैकीं एखादा मला विचारतो, "सर, तुम्ही कोण आहां ?" माझें उत्तर सहसा असें असतें कीं, मी कोण आहे हें सांगणें कठीण असलें तरी मी मटिरिआलिस्ट नाहीं, एवढें निश्चित. आणि मग, माझी बाजू मांडण्यापूर्वीं, मी मित्रास विचारतों कीं, 'काय रे, मटिरिआलिझम् म्हणजे काय याचा एकवार खुलासा करशील काय ?'

यावर उत्तर येतें तें असें : 'मटिरिआलिझम् म्हणजे काय हें सांगणें अगदींच सोपें आहे. आम्ही मटिरिआलिस्ट असें मानतों कीं, विश्वांत माणसाचें मन अथवा विचार निर्माण होण्यापूर्वीं मॅटर अस्तित्वांत होती व या मॅटरमधूनच पुढें क्रमाक्रमानें ( म्हणजे द्वंद्वात्मक स्वयंगतीनें ) माणसाचें मन व त्याचे विचार निर्माण झाले. तेव्हां आधीं मॅटर व मग त्यापासून विचार किंवा कल्पना इत्यादि अस्तित्वांत आल्या. भूगर्भशास्त्र, मानववंशशास्त्र, डार्विनचा विकास-सिद्धान्त यांपैकीं कशाकडेहि नुसती नजर फेंकल्यास तुम्हांला आमचें म्हणणें मान्य करावें लागेल—. आमचें म्हणणें मान्य करावें लागेल कीं, एक काळ असा होता कीं, या विश्वांत नुसती मॅटर होती, पण माणूस अथवा त्याचें मन नव्हतें. या उलट तुमचा हेगेल म्हणतो कीं, सारी सृष्टि कल्पनेंतून किंवा विचारांतून निर्माण झाली !'

यावर माझ्या मित्रास मी असें म्हणेन कीं, बाबा रे, हेगेल माझा कोणी नव्हे. हेगेल काय म्हणतो तें ( तत्त्वज्ञानाचा शिक्षक असूनहि ) मला समजत नाहीं. तेव्हां आपण हेगेल बाजूस ठेवून तूं काय म्हणतोस याचाच एकदां नीटवार विचार करूं.

'मॅटर' म्हणजे तरी काय ?

विश्वांत प्रथम मॅटर होती असें तूं म्हणतोस तेव्हां आपण मॅटर म्हणजे तरी काय हें प्रथम ठरवूं. मी बसलों आहे ती खुर्ची मॅटर आहे, सोन्याची चीप मॅटर आहे आणि बागेंतील मातीचें ढेकूळहि मॅटर आहे असें आपण म्हणतों. पण या सर्व वस्तूंत असा काय सारखेपणा आहे कीं, त्या सर्व मॅटर आहेत किंवा मॅटरच्या बनलेल्या आहेत, असें आपण म्हणावें ? माझी लोखंडी खुर्ची काळी आहे, सोन्याची चीप पिंवळी असते व बागेंतील मातीच्या ढेकळाच्या रंगाचें नांव जरी मला माहीत नसलें, तरी तो रंग माझी खुर्ची अथवा सोनें यांच्या रंगाहून वेगळा असतो एवढें निर्विवाद. रंगच काय, या तीन्हीहि वस्तूंचे रूपादि जे इतर प्रत्यय येतात तेहि एकमेकांपासून सर्वस्वीं भिन्न असतात. असें असूनसुद्धां आपण या सर्व वस्तू मॅटरच्या बनलेल्या आहेत असें मानतों. जणूं कांहीं मातीच्या गोळ्याला निरनिराळ्या रीतींनीं थापटून-थोपटून कुंभार ज्याप्रमाणें गणपति अथवा नागोबा बनवितो त्याप्रमाणें मॅटर नांवाच्या पदार्थाचे अगदीं बारीक बारीक कण असून त्यांपासून मृत्तिकादि सर्व पदार्थ बनविलेले असतात. पण हा मॅटर नांवाचा पदार्थ कसा असतो तो एकदां दाखवा तरी, अशी मागणी केल्यास कांहींहि दाखवितां येणार नाहीं. यावर असें म्हटलें जाईल ( निदान म्हटलें जावें ) कीं, मॅटर नांवाचा एखादा पदार्थ खिशांतून काढून दाखवितां येणार

नाहीं. हें खरें; पण इतरत्रहि हीच अडचण येईल. 'सुवर्ण दाखवा' असें म्हटल्यास आपण अंगठी दाखवाल किंवा मोहर दाखवाल किंवा सोन्याची चीप दाखवाल किंवा कांहीं विशिष्ट नामरूपाचा दुसरा एखादा सोन्याचा पदार्थ दाखवाल. पण जें अंगठीहि नाहीं किंवा मोहरहि नाहीं किंवा चीपहि नाहीं किंवा दुसरा असाच एखादा सोन्याचा आकृतिविशेषहि नाहीं, असें केवळ सुवर्ण, निचळ सुवर्ण, आपणांस दाखवितां येणार नाहीं. पण तशी गरजहि नाहीं. वर सांगितलेल्या वस्तूंत जें साम्य आहे, जे ( भास्वरवर्णादि ) सामान्यधर्म आहेत, त्या सामान्यधर्मांचा संघातच फक्त सुवर्ण या शब्दानें निर्दिष्ट होतो. याच न्यायानें, ' मॅटर ' याचा अर्थ, ज्या अनंत वस्तूंना आपण ' मटेरिअल ' असें म्हणतों, त्या सर्वांत असलेलें साम्य, एवढाच होय.

हें उत्तर प्रथमदर्शनीं ठीक दिसतें. पण दोन अडचणी येतात :

पहिली अशी : अनंत प्रकारच्या वस्तूंत कांहीं सामान्यधर्म असतात व ते सामान्यधर्म म्हणजेच ' मॅटर ' असें म्हटलें. पण अडचण अशी येते कीं, हा सामान्यधर्म ज्या वस्तूंत राहतो, ज्या पदार्थाचा तो धर्म आहे असें आपण म्हणतों, त्या वस्तूस, त्या पदार्थास काय म्हणावयाचें ? सुवर्णाच्या बाबतींत ही अडचण एवढ्या तीव्रतेनें भासावयाची नाहीं. कारण, आपण असें म्हणूं शकूं कीं, सुवर्ण नांवाचा जो गुणसंघात असतो तो मॅटरच्या ठिकाणीं राहतो किंवा हे गुण मॅटरचे असतात. पण खुद्द मॅटरबद्दलच असें कसें म्हणतां येईल ?

दुसरी अडचण अशी : मॅटर म्हणजे कांहीं गुणांचा संघात असें म्हटल्यावर, हे गुण कोण-कोणचे असें विचारल्यास सांगणें जरा कठीण जातें. सुवर्णाच्या बाबतींत, त्याचा रंग, त्याचें विशिष्ट दाढ्र्य, कांहीं रासायनिक प्रतिक्रिया अशा प्रकारें त्याच्या गुणांची विल्हेवारी देतां येईल. पण ज्यास ' मॅटर ' म्हणतां येईल तो गुणसमुच्चय कुठला असें विचारल्यास ' वजन असणें ' यापलीकडे कांहीं सांगतां येणार नाहीं व हें सांगणेंहि चूक ठरेल. कसें तें पाहा. अखिल विश्वास वजन नाहीं. कारण वजन एका वस्तूच्या दुसऱ्या वस्तूवर होणाऱ्या आकर्षणाचा परिणाम आहे व सर्व विश्वाच्या बाहेर कुठलीच वस्तु शिल्लक नसल्यानें सर्व विश्वावर कशाचेंच आकर्षण होणार नाहीं व त्यामुळें अर्थात् विश्वास वजन आहे असें म्हणतां येणार नाहीं. ज्यास वजन आहे तें मॅटर असें लक्षण ( = व्याख्या ) केल्यास अखिल विश्व हें मटिरिअल नाहीं असें म्हणावें लागेल. असा प्रसंग निदान मटिरिआलिस्ट तरी आपल्यावर ओढवून घेणार नाहींत !

तेव्हां मॅटर म्हणजे काय हा आपला प्रश्न होता तसाच राहतो. सुवर्ण म्हणजे काय ? या प्रश्नाइतक्या सोयीस्कर रीतीनें त्याची विल्हेवाट लावतां येणार नाहीं.

म्हणून आपण एका निराळ्या दिशेनें प्रयत्न करूं.

### अनुभूतींची अखंड परंपरा

" ( या विश्वांत ) काय आहे ? " असें विचारल्यास जें ' नाहीं ' असें म्हणतांच येणार नाहीं; ज्याचें अस्तित्व शंकातीत आहे, त्यापासून आपण सुरुवात करूं. असें केलें म्हणजे अनुभूती आहेत येथून आपणांस सुरुवात करावी लागेल. आपणांस विविध रंग दिसतात, अनेक वास येतात, नाना तऱ्हेचे स्पर्शानुभव मिळतात आणि सुखदुःखांसारखेहि प्रत्यय येतात. या अनुभूती आहेत, हे प्रत्यय आहेत, निखालस आहेत. ज्याचा प्रत्यय येतो तें नाहीं असें कसें म्हणावयाचें व त्याला अर्थ तरी काय ? तेव्हां आपण असें म्हणूं कीं, निर्विवादपणें ज्याचें अस्तित्व आपणांस मान्य केलेंच पाहिजे असें जें कांहीं आहे तें म्हणजे अनुभूति.

इथें तीन-चार गोष्टींचा खुलासा करणें प्राप्त आहे :

( १ ) प्रथमच लक्षांत घ्यावयाची गोष्ट ही कीं, अनुभूति हा शब्द वापरून मागल्या दारानें मीं ' आयडिआलिझम् ' आंत घेतला नाहीं. अनुभूति म्हणजे, ज्याचा प्रत्यय येतो, ज्याचा प्रत्यय येऊं शकतो, जें प्रत्यक्ष आहे अथवा प्रत्यक्ष होऊं शकेल तें तें सर्व. आपल्या आजूबाजूस ( यांत शारिरांतर्गत व्यापारहि आले ) एकसारखें कांहीं तरी घडत असल्याची जाणीव आपणांस सतत येत राहते. या सर्वांस अनुभूति म्हटल्यानें आपण आयडिआलिझमच्या जवळ येत नाहीं. कारण या सर्व अनुभूती म्हणजे कदाचित् मॅटरहि असेल किंवा आणखीहि








कांहीं असूं शकेल. तो पुढचा प्रश्न आहे. इतकें निश्चित कीं, आपणांस कशाचा तरी अनुभव येतो, एकसारखा येत राहतो व त्यास 'मॅटर' किंवा 'ब्रह्म' अशीं दुसरीं नांवें देण्यांत अतिप्रसंग होत असल्यानें आपण त्यास अनुभूति म्हणूं. सर्व वाद टाळण्याच्या बुद्धीनें, अत्यंत निर्लेप म्हणून, अनुभूति हा शब्द वापरला आहे. तेव्हां त्याच्यावरच वाद होऊं नये.

( २ ) आणखी असें म्हणूं नये कीं, ज्या अनुभूतींचें अस्तित्व मी निःखालसपणें मान्य करीन त्या केवळ माझ्याच असणार व इतरांच्या अनुभूतींचें अस्तित्व हें माझ्या दृष्टीनें शंकनीयच राहणार. आपण असें म्हणूं नये, कारण ' मी ' व ' इतर ' हा फरक अनुभूतींच्या आगमनानंतरचा आहे. अनुभूती येतात तेव्हां त्या माझेपणाचा शिक्का कपाळावर घेऊन येत नाहींत. ' माझा ' अनुभव किंवा ' तुझा ' अनुभव या चिठ्या आपण मागाहून डकवितों. आपल्या साऱ्या अनुभूती ' मी ' च्या रंगानें नटून येतात हा ( अप- )सिद्धान्त कांहीं तत्त्वज्ञांनीं प्रसृत केला आहे. हे तत्त्वज्ञ असेंहि मानीत आले आहेत कीं, ' माझी अनुभूति ' व ' तुझी अनुभूति ' हीं स्वतंत्र बेटें असून त्यांच्यांत दळणवळण असंभवनीय आहे. या समजाला परंपरे-शिवाय फारसा आधार नाहीं. संगीताची एखादी लकेर ऐकल्यावर जी अनुभूति येते तिचें सारसर्वस्व तिच्या ' माझे 'पणांत सांठविलें आहे, असें कां मानावयाचें ? त्या अनुभूतीला स्वतःचें म्हणून स्वत्व आहे व प्रसंगविशेषीं, ज्यास ' मी ' म्हणून संबोधिलें जातें त्या क्षेत्रांत ती पदार्पण करते, असें मानण्यास काय प्रत्यवाय आहे ?

( ३ ) शिवाय असें म्हणूं नये कीं, जी अनुभूति स्वतःच्या अस्तित्वाची द्वाही फिरवीत येते ती केवळ या क्षणाचीच होय. गत क्षणाच्या मृत अनुभूतींचा प्रत्यय येत नसल्यानें तिच्या अस्तित्वा-चा पुरावाहि नष्ट झाला असें म्हणूं नये. कारण, चालू क्षणाच्या अनुभूतींतच गतक्षणाच्या अनुभूतीं-चा प्रत्यय सांठविला आहे. हें कसें शक्य आहे असा प्रश्न करूं नये. कारण ज्याचा प्रत्ययच येतो तें कसें संभवेल, हा प्रश्न निरर्थक आहे. एखाद्या अननुभूत रंगच्छटेची आपणांस प्रचीति मिळाली तर, अशी नवीन रंगच्छटा संभवेलच कशी, असा प्रश्न अर्थहीन नव्हे काय ?

( ४ ) आणखी एक गोष्ट ध्यानांत धरणें येथें अवश्य आहे. सर्वसामान्यपणें आपण ज्यास आपला अनुभव म्हणून संबोधीत असतों, त्यांतील बराचसा भाग अनुभवाचा नसतो. मानवबुद्धिनिर्मित सिद्धान्तांची अथवा कल्पनांची त्यांत भर घातलेली असते. तात्त्विक विचारास अपरिचित असलेल्यांना ही गोष्ट लवकर उमगत नाहीं. ' फूल ' पाहिलें किंवा फुलाचा अनुभव घेतला असें आपण म्हणतों. पण थोडा विचार केल्यास लक्षांत येईल कीं, आपणांस अनुभव येतो तो कांहीं रंगच्छटांचा, कांहीं सुवासांचा, कांहीं स्पर्शविशेषांचा. फूल नांवाचा पदार्थ कांहीं आपल्या प्रत्ययास येत नाहीं; हें पदार्थत्व अथवा 'वस्तु'पण आपण त्याच्यावर बळेंच लादतों; किंवा असें म्हणूं कीं, बुद्धिनिर्मित जें वस्तुतत्त्व त्या-भोंवतीं आपण कांहीं अनुभूतींचे थर चिकटवितों व जी रचना तयार होते त्यास 'फूल' म्हणतों. असो. सांगावयाचा मुद्दा हा कीं, सरसहा आपण ज्यास आपला अनुभव असें म्हणत असतों त्यांत सर्वच कांहीं निव्वळ अनुभूती, निचळ संवेदना असत नाहींत, तर त्यांतील बराचसा भाग बौद्धिक रचनेचा असतो.

इतका खुलासा केल्यावर, ज्या एका नवीन दिशेनें सुरुवात करूं म्हटलें, तिचा पुनरुच्चार करतों. या विश्वांत अनुभूती आहेत, त्या एकसारख्या येत आहेत, त्यांची अखंड परंपरा चालली आहे, एक विशाल मिरवणूक जात आहे, अशी सुरुवात आपण करूं या.

## अनुभूतिसमुदायांतील यांत्रिक संगति

याच्या थोडें पुढें जाऊं. या मिरवणुकींतील निरनिराळ्या अनुभूतींत निरनिराळ्या प्रकारच्या संगती आढळतात. त्यांपैकीं एका संगतीवर गणित-शास्त्र आधारलें आहे. त्यास आपण यांत्रिक संगति म्हणूं. या संगतीचा विशेष हा कीं, परिस्थिति ठराविक असेल तर परिणामहि ठराविकच होतात व परिस्थिति बदलल्यास परिणामहि बदलतात. कुठल्याहि यंत्राच्या ज्या क्रिया घडत असतात त्यांत ही संगति आढळते. म्हणूनच त्यास यंत्र म्हणाव-याचें. स्प्रिंगवर चालणारी खेळांतील मोटार एखाद्या








खोलींत सोडली तर ती भिंतीवर जाऊन आपटेल. त्या आपटण्यामुळें जर ती परत पहिल्या जागेवर येईल तर पूर्ववत्–अगदीं पूर्ववत् त्याच जागीं ती भिंतीवर आपटेल व तिची किल्ली वरचेवर देण्याची कांहीं व्यवस्था केल्यास, ठराविक मार्गानें भिंतीवर आपटण्याचा तिचा क्रम अव्याहत चालेल. प्रत्यक्ष प्रयोग केल्यास दर वेळीं मोटारीचा वेग व मार्ग थोडा बदललेला दिसेल. कारण, दर वेळीं परिस्थिति (उदा. स्प्रिंगचा ताण, वाऱ्याचा झोत, आपटण्यामुळें तिच्या आकारावर झालेला परिणाम इत्यादि ) थोडी बदललेली असते. परिस्थितींत बिलकुल बदल नाहीं अशी कल्पना केल्यास प्रतिक्रियेंत कांहींच फरक होण्याचें कारण नाहीं. याचें नांव यांत्रिक संगति. अशी यांत्रिक संगति जेथें असते तेथें कुठल्या क्षणीं कोणती घटना होईल याचें तंतोतंत भविष्य वर्तविणें तत्त्वतः शक्य असतें.

या उलट एखाद्या व्यक्तीनें बुद्धिपूर्वक केलेल्या क्रियांतील संगति तपासा. येथें परिस्थितीची पुनरावृत्ति झाली, तर प्रतिक्रियेची पुनरावृत्ति होईल, असा भरंवसा नाहीं. कारण, त्या व्यक्तीस कांहीं तरी साध्य असतें व तें साध्य लक्षांत घेतल्यासच त्या क्रियांची संगति लागते. यास वाटल्यास आत्मिक संगति म्हणा. असो.

सांगावयाचा मुद्दा हा कीं, या विश्वांतील घटनांत अथवा अनुभूतींत निरनिराळ्या प्रकारच्या संगती आढळतात. याहि थोडें पुढें जाऊन शेवटचें पाऊल टाकूं या. ज्या अनुभूतींच्या परंपरेंत गणितशास्त्रास आधारभूत असलेली यांत्रिक संगति सांपडते त्या परंपरेस, त्या अनुभूतींच्या समुदायास, त्या अनुभूति-संतानास (सं + तन् = पसरणें या धातूपासून 'संतान' हा शब्द सिद्ध झाला असून बौद्ध-दर्शनांत तो वारंवार वापरला जातो–) 'मॅटर' म्हणावयाचें. बौद्ध-दर्शनांत, प्रत्येक वस्तु एक क्षणभरच अस्तित्वांत असते व लगेच दुसऱ्या क्षणीं नष्ट होते, असें मानलें आहे. त्यांत खोल अर्थ भरला आहे. या क्षणाचा घट लगेच नष्ट होऊन त्याच्या जागीं दुसरा घट येतो. याचा अर्थ या क्षणाची घटानुभूति व पुढच्या क्षणाची घटानुभूति या भिन्न आहेत असा आहे. यांत चूक कांहींच नाहीं. व्यवहारांत आपण ज्यास घट म्हणतों तो वास्तविक एक घट नसून घट-संतान असतें असें जें बौद्ध-दर्शनांत म्हटलें आहे, त्याचा अर्थ घट म्हणजे अनुभूतींची एक परंपरा होय, हाच आहे. पण अनुभूतींच्या या परंपरेस 'मॅटर' कां म्हणावयाचें याचा खुलासा बौद्ध-दर्शनांत नाहीं. तोच शोधण्याचा प्रयत्न आपण येथें करीत आहोंत. आपण वर असें म्हटलें आहे कीं, ज्या अनुभूतिपरंपरेंत यंत्रशास्त्रास पायाभूत असलेली संगति मिळते त्यास 'मॅटर' म्हणावयाचें.

वरील विवेचन अपरिहार्यतया दुर्बोध होणारच. म्हणून उदाहरणें घेऊन सुबोधता आणण्याचा प्रयत्न करतों.

मी ज्यावर लिहीत आहे तें टेबल घ्या. ज्यास आपण टेबलाचा स्पर्श असें म्हणतों, ज्यास आपण टेबलाचें रूप म्हणतों, अशा कांहीं अनुभूती या क्षणीं मला येत आहेत. अशा अनुभूतींच्या संघाताहून वेगळा टेबल नांवाचा पदार्थ मला ज्ञात नाहीं, तो आहे असें मानण्यास कांहीं आधार नाहीं व तसें अज्ञात आणि अज्ञेय टेबल आहे, असें मानण्याचें कांहीं प्रयोजनहि नाहीं. ज्या प्रकारच्या अनुभूती या क्षणीं मला येत आहेत, नेमक्या त्याच प्रकारच्या (किंवा दुसऱ्या कोठल्या तरी ठराविक प्रकारच्या) अनुभूती परत केव्हां मिळतील याचें गणित मांडतां येईल. कारण, गणित-शास्त्रास अनुकूल असलेली संगति त्या अनुभूति परंपरेंत मिळते. किंबहुना, अनुभूतींच्या ज्या विस्तारांत आणि जेवढ्या मर्यादेपर्यंत अशी यांत्रिक संगति सांपडते तेवढ्या विस्तारास आणि त्या मर्यादेपर्यंतच मॅटर म्हणावयाचें. या गणिती (अथवा यांत्रिक) संगतीचें सूत्रवाक्य असें : परिस्थिति ठराविक असेल तर परिणामहि ठराविकच होतील. टेबल हें मॅटर आहे. कारण, त्या शब्दानें निर्दिष्ट होणाऱ्या अनंत अनुभूतींत ही








संगति आढळते.[1] अशी संगति असते म्हणूनच खोलींत गेल्यावर, विशिष्ट कोनांतून, विशिष्ट अंतरावरून, विशिष्ट प्रकाशांत, चक्षुरिंद्रियांची विशिष्ट रचना असेल तर, अमुक एक अनुभूति मिळेल, अशी अपेक्षा आपणांस करता येते व ती फलद्रूपहि होते. अशी अपेक्षा करतांना आपण प्रत्यक्ष गणित मांडीत नाहीं. कारण त्याची जरूर नसते. ढोकळ मानानें काम भागतें. पण मुद्दा हा आहे कीं, तसें गणित मांडतां येईल; कारण त्या अनुभूतींच्या परंपरेंतच तें गणित सांठविलेलें आहे असा आपला विश्वास असतो. त्या विश्वासाच्या बळावरच आपण टेबलाला ' मॅटर ' म्हणतों. पण समजा, या विश्वासानें आपणांस दगा दिला, अगदीं अनपेक्षित रीतीनें ज्यास आपण टेबल म्हणतों तें बघतां बघतां छतास जाऊन भिडलें, तर त्या टेबलास आपण मॅटर म्हणणार नाहीं; सुताटकी म्हणूं, स्वप्न म्हणूं, भ्रम म्हणूं किंवा असेंच कांहीं तरी म्हणूं.

आकाशांतील ग्रहगोल ' मॅटर ' आहेत. याचा अर्थ असा कीं, त्यांचे जे दृक्प्रत्यय ( म्हणजे अनुभूती ) येतात त्यांचें गणित मांडतां येतें, अमुक वेळीं अमुक प्रत्यय येईल असें भविष्य वर्तवितां येतें. हें भविष्य वर्तवितां येतें याचें कारण अनुभूतींच्या विशिष्ट प्रवाहांत गणितशास्त्रास आधारभूत असलेली संगति अनुस्यूत आहे, हेंच होय. या संगतीस आपण नियमबद्धता म्हणतों. जेव्हां ग्रहांच्या गतींत अशी नियमबद्धता असल्याची जाणीव नव्हती, तेव्हां ग्रहांना ' मॅटर ' न मानतां देवता मानणें रास्तच होतें.

येथपर्यंत मॅटरची व्याख्या झाली ती अशी : अनुभूतींच्या परंपरेंत यांत्रिक संगति असेल तर त्यास ' मॅटर ' म्हणावयाचें. पण हें टेबल एक मटिरिअल वस्तु अथवा जड पदार्थ आहे, असें आपण म्हणतों तेव्हां त्यांत आणखीहि कांहीं अभिप्रेत असतें.

गेल्या क्षणीं मीं पाहिलें तें टेबल व आतां पाहात असलेलें टेबल ही एकच वस्तु आहे, असें आपण म्हणतों त्याचा प्रथम अर्थ असा कीं, गेल्या क्षणीं आलेल्या अनुभूतींचा संघात व या क्षणीं येत असलेल्या अनुभूतींचा संघात यांच्यांत खूप साम्य अथवा सरूपता आहे. केवळ सरूपता असून भागत नाहीं. या अनुभूतिसंघात किंवा अनुभूतिसंतानांत ( कालिक ) सामीप्य, सांनिधि अथवा सलगता, पाहिजे असते. आपण टेबलाकडे पाहात असतां ( व भोंवळ येणें, डोळे झांकणें, प्रकाश बंद होणें असें कांहीं अवांतर कारण नसतां ) जर आपल्या अनुभूतींत खंड पडला व थोड्या वेळानें पूर्वसदृश अनुभूतिपरंपरा सुरू झाली तर तेंच हें टेबल, असें आपण म्हणणार नाहीं. हें टेबल हा एक जड पदार्थ आहे असें आपण म्हणतों तेव्हां त्यांत पुढील अर्थ सामावलेला असतो. विशाल अनुभूतिप्रवाहांत आपणांस अशी एक धारा सांपडली आहे कीं, तिच्यांत असलेल्या अनुभूतिसमुदायांत, ( १ ) ( यांत्रिक ) संगति ( २ ) सांनिधि व ( ३ ) सरूपता आहे. ज्यास आपण टेबल म्हणतों तो अशा प्रकारच्या अनुभूतींचा समुदाय आहे. ती एक सुटी अनुभूति नाहीं; मानवबुद्धिनिर्मित रचना आहे.

जड वस्तूची या प्रकारें व्याख्या करून, आपण जडवादी अथवा मटिरिआलिस्ट कोणास म्हणावयाचें तें पाहूं. विश्वांतील साऱ्या अनुभूतिपरंपरेंत वर वर्णन केलेली, गणितशास्त्रास आधारभूत असलेली, यांत्रिक संगति एवढी एकच काय ती संगति सांपडते असें ज्यास म्हणावयाचें असेल, तो ' मटिरिआलिस्ट ' होय. त्याचा विश्वास खरा असेल तर विश्वांत पुढें येणाऱ्या कोठल्याहि घटनेचें ( = अनुभूतिसंघाताचें ) तंतोतंत भविष्य वर्तविणें तत्त्वतः शक्य होईल.

### श्रेयःसाधनेची संगति

विश्वांतील सर्व अनुभूतींना हीच एक संगति—

---

१ याहूनहि खोलांत जावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, अशी संगति मिळावी या दृष्टीनेंच आपण अनुभूतींचा संग्रह करीत असतों. जिज्ञासूंनीं या संबंधांत जानेवारी १९५२ च्या ' नवभारत 'मधील ' मानवतावाद ' हा लेख पाहावा.

यांत्रिक संगति व श्रेयःसाधनेची संगति या दोन संगतींशिवाय अनुभूतींच्या परिसरांत आणखी कांहीं संगती मिळतात. त्यांतील एका संगतीस आपण काव्य म्हणतों, दुसऱ्यास सौंदर्य म्हणतों, तिसऱ्यास संगीत म्हणतों. अशा अनेक संगती निरनिराळ्या अनुभूतींना जोडीत असतात.

विश्वांत काय आहे असें विचारल्यास मी म्हणेन कीं मॅटर आहे, कल्याणसाधना आहे, काव्य आहे, संगीत आहे व आणखीहि कांहीं आहे. यांपैकीं एकांतून दुसरें निर्माण होतें असें म्हणणें बरोबर होणार नाहीं. कारण रूढ अर्थानें हे कांहीं निरनिराळे पदार्थ नाहींत. अनुभूतींच्या निरनिराळ्या संघातांना आपण दिलेलीं तीं समुदायवाचक नांवें आहेत. या सर्वांना आधारभूत जर कांहीं असेल तर त्या अनुभूती. पण कोठल्याहि सुट्या अनुभूतीला 'मॅटर' म्हणतां येणार नाहीं, मन म्हणतां येणार नाहीं, आत्मा म्हणतां येणार नाहीं. त्या अनुभूती केवळ स्वलक्षण, म्हणजे त्यांना स्वतःचा भाव असतो, असें बौद्धदर्शनांत म्हटलें आहे व आधुनिक तत्त्वचिंतक बर्ट्रांड रसेल याचें मतहि बहुंशीं हेंच आहे.

विश्वांत केवळ मॅटर आहे असें मी मानीत नाहीं म्हणून मी मटिरिआलिस्ट नव्हे. मी कोण आहे हा प्रश्न अलाहिदा.

ही यांत्रिक नियमबद्धता सांधून राहिली आहे असें मला वाटत नाहीं. उदाहरणार्थ, ज्याला आपण मानवाचें व्यक्तिमत्त्व म्हणतों त्या अनुभूतिपरंपरेंत दुसऱ्या एका प्रकारची संगति अनुस्यूत आहे असा माझा विश्वास आहे. ज्या अनुभूतिसंघाताच्या संतानास आपण 'कॉ. डांगे' म्हणतों त्यांत संबद्ध असलेली संगति व ज्या अनुभूतिसमूहांच्या परंपरेस मी 'माझें टेबल' म्हणतों त्यास सांधणारी संगति या भिन्न आहेत. टेबल मॅटर आहे आणि म्हणूनच कॉ. डांगे मॅटर नव्हेत. ज्याला आपण मानवी मन म्हणतों त्यांत अंतर्हित असणाऱ्या विविध अनुभूतींची संगति लावावयाची असल्यास मॅटर ही कल्पना लागू पडत नाहीं. श्रेयःसाधन अथवा कल्याणप्राप्ति ही कल्पना अधिक उपयोगी ठरते. मानवी आयुष्याचा अन्वय आणि अर्थ लावावयाचा झाल्यास, श्रेयःसाधनासाठीं अथवा कल्याणाप्रत पोंचण्यासाठीं चाललेली धडपड, या कल्पनेनें तो लावतां येतो. तीच गोष्ट मानवी इतिहासाची. कल्याणाप्रत पोंचण्यासाठीं मानवतेनें चालविलेली धडपड या दृष्टीनें इतिहासाकडे पाहिलें असतां जितकी संगति मिळते, तितकी इतिहासावरील मटिरिआलिस्ट भाष्यानें लागत नाहीं. ऐतिहासिक घटना यांत्रिक भासत नाहींत, त्या गणितांत बसत नाहींत, म्हणजेच ऐतिहासिक घटनांचें तंतोतंत भविष्य वर्तविणें तत्त्वतः अशक्य आहे.

---

## चारच क्षण !

चारच क्षण गुणगुणुनि जीवनस्वर मम विरती
चारच या पाउलांत माझी बंदिस्त गती
यांतच कढणें कुढणें, क्षण हंसणें, पळ फसणें
चारच स्वप्नें हृदयीं माझ्या फळती, फुलती !

वेंचाया कण कांहीं अभिमानी मी झुकतों
कवड्यांस्तव चार कधीं माक्षेपणही विकतों,
चुकवितों हिशेब असे श्वासांचे, घासांचे
चुकल्याविण जगतांना, जीवनास मी मुकतों !

जीवन हें ! यांत कुठें शोधूं हो भव्यपणा ?
जीवन हें ! भिववाया येथें शतभग्न खुणा !
जीवन हें ! जेथ असे ध्येय मात्र श्वसनाचें !
जीवन हें ! नियतीची नित्याहुति ही मरणा !

गळुनी हें पुष्प कधीं व्हायचीच जर माती
कां न ढळावें असतां भास्कर माथ्यावरतीं ?
रुसलेले रस इथले रे मृत्यो ! सेवुन जा
चार दळांचीं गणितें सत्वर घे आवरतीं !

—मंगेश पदकी










श्री. दा. गो. देशपांडे

# ज्ञान-साधना

मनुष्यजीवनाचें अंतिम ध्येय काय असें नेहमीं विचारण्यांत येतें. त्याचें उत्तर अतिशय सोपें आहे. तें असें कीं, अज्ञानाचा काळोख नाहींसा होऊन ज्ञानाचा प्रकाश दिसणें. ह्या ठिकाणीं अधिक स्पष्टीकरणाकरितां हें व्यक्त करणें अवश्य आहे कीं, अज्ञान आणि अपूर्णता हीं एकच असून ज्ञान आणि पूर्णता यांत द्वैत नाहीं. म्हणून ज्ञानी होणें ही मानवी जीवनाची मुक्तावस्था होय.

ज्ञान-अज्ञानाचा झगडा हा मनुष्याच्या जन्मा-बरोबरच सुरु होतो. अनंत कालाच्या क्षितिजावरून ह्या जगांत नव्यानें फेंकलें गेलेलें बालक, आजच्या शास्त्रीय माहितीला अनुसरून पाहातां, केवळ हाडामांसाचें एक बाहुलें नसतें, तर तो एक अज्ञानाचा अतिशय संवेदनाक्षम असा जिवंत गोळा असतो. तो तान्हा दोन जगांत हिंदकळत आणि वावरत असतो. एक त्याचें चिमुकुलें मानसिक विश्व आणि दुसरी भोंवतालची सृष्टि. त्याला ह्या अवस्थेंत या दोन्हीं जगांची कांहींच कल्पना नसते. त्याला जसजसें समजूं लागतें, तसतसा त्याच्यांतला 'मी' जागृत होतो आणि त्याला 'अ-मी' ची जाणीव होते. त्याच्या 'मी'-( self )चे आणि 'अ-मी'-( not-self ) चे परस्परसंबंध वाढूं लागतात. त्याला बऱ्याच गोष्टी कळूं लागतात. प्रथम स्वतःची आई, नंतर इतर माणसें, मग समाज आणि शेवटीं जग ह्यांचा विस्तार त्याच्या नजरेच्या टप्प्यांत धीरेधीरे येऊं लागतो. याच्या पुढची पायरी म्हणजे या सगळ्या नात्यां-( relations )चीं प्रेरक मूल्यें त्याच्या ध्यानांत येतात. आर्थिक, सामाजिक, राजकीय, नैतिक आणि मानवी मूल्यें यांचा त्याला बोध होऊं लागतो. ह्या बोधाचा परिणाम असा होतो कीं, तो नातीं ( relations ) आणि मूल्यें (values) यांच्यांतला संबंध प्रस्थापित करून त्यांतील संगति शोधण्याचा नि लावण्याचा प्रयत्न करतो. आणि असें करण्यांत त्याला अपयश आलें कीं झगडा ( conflict ) निर्माण होतो. ह्या झगड्यांची संख्या जितकी अधिक तितका अज्ञानाचा क्षय कमी. झगडे जसे कमी तशी त्याची समरसता वाढते. झगड्यांचा संपूर्ण लय झाला कीं त्याला विश्वाचें कोडें उलगडतें आणि तो ज्ञानी होतो. आध्यात्मिक परिभाषेंत यालाच 'आत्मा परमात्म्यांत विलीन झाला' असें म्हणतात.

## इन्द्रियें कार्यक्षम पाहिजेत

मनुष्याला ज्ञानाचा लाभ इंद्रियांच्या द्वारां होतो. ज्ञानेंद्रियें हा सुंदर शब्द आहे. इंग्रजींत ह्या ज्ञानें-द्रियांना common senses म्हटलें आहे. हीं इंद्रियें ज्ञानाचीं वाहक आहेत. आपण ज्या वेळीं एखादी वस्तु पाहतों त्या वेळीं त्या वस्तूचा रंग, तिचा आकार, आकारांतून सूचित होणारी प्रतिमा आणि प्रतिमेच्या मागें दडलेला अर्थ एवढ्या गोष्टींचा आपण अनुभव घेतों. असेंच इतर इंद्रियांचें आहे. अर्थात्, प्रत्येक इंद्रियाच्या साहाय्यानें येणारी अनुभू-ति स्पष्ट, खरी आणि शुद्ध असावयास तीं तीं इंद्रियें संवेदनाक्षम आणि कार्यक्षम असलीं पाहिजेत. जितकी कार्यक्षमता समर्थ आणि संवेदनाक्षमता सूक्ष्म तितकी येणाऱ्या अनुभूतीची गति पण जास्त. जितकी गति जास्त तितकी प्रगति अधिक. प्रगतीची किंवा विकासाची परिसीमा ही परिपूर्णतेची नांदी आहे.

म्हणून भारतीय तत्त्वज्ञानांत षड्दर्शनांतील योग-पद्धतींत इंद्रियांची सूक्ष्मता आणि शक्ति वाढविण्या-वर भर आहे. संत तुकारामाच्या ' पडलें वळण इंद्रियां सकळां ' या अभंगांत इंद्रियांचें सामर्थ्य अप्रत्यक्ष रीत्या व्यक्त झालें आहे. ' मन गया तो जान दे, मत जाने दे शरीर ' या हिन्दी काव्य-पंक्तींतसुद्धां तोच आशय उघड आहे म्हणूनच इंद्रियांचें संपूर्ण आरोग्य आणि ज्ञान यांचा संबंध मूलभूत आणि सर्वगामी आहे.

इंद्रियांची संख्या मर्यादित आहे, परंतु प्रत्येक इंद्रियांतून ज्या संवेदना ( sensations ) निर्माण होतात त्या असंख्य आहेत. संवेदना ह्या, इंद्रियें जेव्हां उत्तेजित होतात तेव्हां, अस्तित्वांत येतात. संवेदनेंतून जेव्हां अर्थ येतो नि निघतो तेव्हां अनुभव येतो. अनुभवांतून विचार आविर्भूत होतात. विचार ज्ञानाचा मार्ग सुलभ करतात.

## संयत पण विशाल जीवन

इंद्रियें आणि संवेदना यांच्या संदर्भात दोन अंगां-चा विचार येतो. पहिला भाग असा कीं, असंख्य किंवा विपुल संवेदनेंतून अनुभव तयार व्हावयास इंदियांवर ताबा असला पाहिजे. ताबा नसला म्हणजे संवेदनांची गर्दी होत जाते आणि अनुभवाचा गोंधळ उडतो. नुसता गोंधळ उडतो असें नव्हे तर बरीचशी संवेदना वायां जाते. संवेदना वायां जाणें याचा अर्थ शक्ति वायां जाणें असा होय. शिवाय, अनुभव रेंगाळतो तो निराळाच. डोळ्यांनीं पाहिलेलें दृश्य, कानांनीं ऐकलेला राग, नाकानें घेतलेला गंध, जिव्हेनें चाखलेला रस आणि त्वचेला जाणवलेला स्पर्श--या सर्वांचा नीट समाचार इंद्रियें ताब्यांत असलीं तरच घेतां येतो आणि अनुभवाचें क्षेत्र समृद्ध होतें. इंद्रियांची खुबी अशी कीं, त्यांचें कार्य कुडींत प्राण असे तों अखंड चालू असतें. या अखंड कार्याचा अपार फायदा लुटण्यांत ज्ञानाची साधना गोंवलेली आहे. हा फायदा सावधान जागृति ( consciousness ) जोपासण्यानें पदरांत पडतो. एकाच वेळीं अनेक कामें करणारा कर्मयोगी हें यांचें अप्रतिम प्रात्यक्षिक होय. अष्टावधानी माणसांत इंद्रियांची केवळ चपलताच व्यक्त होत नाहीं तर इंद्रियांवरचा ताबाहि दिसतो. जेवढा इंद्रियां-वरचा ताबा वृद्धिंगत होईल तेवढा ' सोनियाचा दिवस ' समीप येईल. सोनियाचा दिवस म्हणजे ज्ञानप्राप्तीचा शुभ दिन. दुसरा भाग असा कीं, मनुष्याचें जीवन ठरीव ठशाचें झालें, तर उत्तेजनें तींच आणि संवेदना त्याच असा प्रकार होऊन इंद्रियें बधिर होऊन अनुभव वांझोटा बनत जातो. याचकरितां मनुष्याचें जीवन जिवंत, गतिमान् ( dynamic ) पाहिजे. रोज नवनवी सृष्टि आत्मसात् करण्याची प्रवृत्ति पाहिजे. नृत्य, संगीत, शिल्प, चित्रकला, थोर विभूती, निसर्गरम्य स्थळें, वेगवेगळीं शास्त्रें आणि निरनिराळे देश यांच्याशीं वाढता परिचय ठेवला म्हणजे नवीं उत्तेजनें मिळतात, नवा अनुभव प्राप्त होतो आणि विचारांना परिपक्वता नि सर्वांगीणत्व येतें. थोडक्यांत, ज्ञानाचा प्रकाश दिसण्याकरितां विशाल जीवनाचा आश्रय करणें अवश्य आहे.

आतां प्रश्न असा उपस्थित होतो कीं, इतर प्राण्यांना देखील कमी अधिक प्रमाणांत इंद्रियें असतात, मग त्यांनासुद्धां ज्ञानप्राप्ति होत असावी. शिवाय कांहीं प्राणी असे आहेत कीं, त्यांच्या इंद्रियांचें आणि त्यांच्या चलनवलनाचें माणसाच्या-शीं पूर्ण साम्य दिसतें. तेव्हां त्यांच्या ज्ञानाचें क्षेत्र माणसाच्या ज्ञानक्षेत्रापेक्षां कमी असणें अशक्य होय. अर्थात्, ज्याला उत्क्रांतिशास्त्राची माहिती आहे त्याचा असा ( गैर-) समज होणें शक्य नाहीं. कारण माणसांत उत्क्रांतीची सध्यां तरी परिणति दिसते. माणसाचीं इंद्रियें विशेष स्वरूपाचीं ( specialised ) असूनहि तीं लवचिक ( flexible ), तशींच व्यापक ( universal ) आहेत. इतर जनावरांप्रमाणें माणसांत त्या त्या इंद्रियांचें ठोकळेबाज ( rigid ) काम ठरून गेल्यासारखें नाहीं. इतर जनावरांत पंज्याचें विशिष्ट काम आहे. माणसाच्या हाताचें तसें नाहीं. मनुष्य हातानें जमीन खणतो, शिकार खेळतो नि लेखनहि करतो. याचकरितां एका पाश्चात्त्य तत्त्वज्ञान्यानें माणसाच्या हाताला ' external brain ' म्हटलें आहे. इतर इंद्रियांच्या बाबतींतहि हेंच आहे. जी गोष्ट माणसाच्या इंद्रियांची तीच त्याच्यांतल्या ' कामा '-( Sex )ची. इतर प्राण्यांत हा ऋतुमाना-










प्रमाणें (seasonal) असतो. माणसांत तो सर्व ऋतूंत असतो. म्हणून माणसाचीं इंद्रियें आणि त्याचें चलनवलन यांचें स्वरूप प्राणि-जगतांत वैशिष्ट्यपूर्ण आहे. यावरून इतर प्राण्यांना, मानवाला ज्या प्रगल्भ पद्धतीनें ज्ञानप्राप्ति होते तशी, होत नाहीं, हें स्पष्ट होतें.

'आंतलें जग'

वरील सर्व विवेचनावरून असा समज होणें स्वाभाविक आहे कीं, मनुष्याचीं इंद्रियें म्हणजे 'सब कुछ' होत, तीं ज्ञानाचीं एकमेव साधनें होत. शरीरशास्त्रज्ञांनीं आणि मानसशास्त्रज्ञांनीं इतिहासांत, इंद्रियजन्य संवेदना आणि प्रतिक्रिया (response) यांनाच सगळें श्रेय अर्पण करण्याची चूक केली आहे. वुईल्यम जेम्सचा भावनेचा सिद्धान्त (जो पुढें James-Lang Theory म्हणून प्रसिद्धीस आला), वाट्सन्‌चा वर्तनवाद (Behaviorism) आणि रशियन शास्त्रज्ञ पॅवलाव्हचा Reflex Theory चा सिद्धान्त—हीं सारीं इंद्रियांना 'सब कुछ' मानणाऱ्या प्रवृत्तींचीं अपत्यें होत. अर्थात् ह्या सर्व सिद्धान्तांनीं कांहीं केलेंच असेल तर तें हें कीं, मानवी जीवनांत इंद्रियांचें असलेलें महत्त्व त्यांनीं साधार प्रस्थापित केलें. आणि हें महत्त्व कुणीहि शास्त्रीय दृष्टीचा विचारवंत अमान्य करील हें संभवत नाहीं. पण त्यामुळें इंद्रियांत नसलेलें सर्वगामी सामर्थ्य सिद्ध होत नाहीं. कांहींहि झालें तरी हें इंद्रियांचें कार्य हें प्राथमिक स्वरूपाचें आहे. मानवी इंद्रियांत जी वैशिष्ट्यपूर्णता (specialisation) आणि व्यापकता (universality) आहे तिच्यापेक्षां मोठी अशी पायाभूत (basical) शक्ति नि देणगी निसर्गानें माणसाला दिली आहे. ह्या शक्ती-नि-देणगीमुळेंच मनुष्य हा इतर प्राण्यांपेक्षां सर्वस्वी वेगळा असून प्राणिराज्याचा अनभिषिक्त सम्राट् झाला आहे. माणसावर झालेली ही निसर्गाची खास कृपा म्हणजे माणूस हा शिकणारा नि अनुभवानें शहाणा होणारा प्राणी आहे. माणसापेक्षां खालच्या श्रेणींतील प्राण्यांचें जीवन हें पूर्णपणें सहज-प्रवृत्तीं-(instincts)नीं प्रेरित, बद्ध नि सीमित आहे. हे प्राणी जन्मतांच ह्या सहजप्रवृत्तींचा समूह आपल्याबरोबर घेऊन येतात. त्यांचें आयुष्य ह्या सहजप्रवृत्तींच्या मर्यादित चाकोरींत भ्रमण करतें. त्यांच्या बाहेर ते जाऊं शकत नाहींत. म्हणूनच ह्या प्राण्यांत शिकण्याचा काळ हा जवळ-जवळ नसतोच. अगदीं अलीकडील संशोधनानुसार मानवाची स्थिति मात्र आमूलाग्र भिन्न आहे. मानव पहिल्यांदा जग जें पाहतो तें अशा भांडवला-व्यतिरिक्त. म्हणूनच मानवाच्या आयुष्यांत शिकण्याचा काल हा मोठा आहे. प्रत्येक मनुष्याचें सर्व वागणें हें ह्या जगांतल्या शिकण्यानें आणि अनुभवानें आलेलें असतें. वयाच्या पंधराव्या वर्षापर्यंत मनुष्य जगांत कसें वागावें नि कसें जमवून घ्यावें हें शिकत असतो. पुढें देखील कसें जगावें हें तो शिकण्याची सारखी धडपड करीत असतो. इतर प्राण्यांत असें आढळत नाहीं. म्हणूनच त्यांचा विकास स्थगित झाला आहे आणि माणसाचा तो अविरत चालू आहे. मनुष्य शिकत असतांना त्याच्या अनुभवाचें क्षेत्र नुसतें विस्तृत होतें असें नव्हे, तर तें संपन्न होतें. ह्या संपन्नतेतून त्याची मनःसृष्टि घडत असते. मनुष्याचें शरीर जरी ह्या भौतिक सृष्टींत हालचाल करीत असलें तरी त्याचें व्यक्तिमत्त्व या मनःसृष्टींत, अंतःसृष्टींत असतें. इंद्रियांचीं तोंडें बाहेर असतात. तीं बाहेरचें पाहूं शकतात. आंतलें त्यांना कसें कळावें? आंतलें जोंपर्यंत कळलें नाहीं तोंपर्यंत ज्ञान समग्र-सर्वंकष नि संपूर्ण झालें असें म्हणतां येत नाहीं. हें आंतलें जग म्हणजे आत्मनिष्ठ जग आणि बाहेरचें जग म्हणजे वस्तुनिष्ठ जग होय. विश्व ह्या दोन्हीं जगांनीं बनलेलें आहे. हीं दोन्हीं जगें कळलीं म्हणजेच ज्ञान झालें, नसतां नव्हे. बाहेरच्या जगाचें आकलन आंतल्या जगाच्या प्रचीतिविना आभासमय होय. कारण बाहेरचें जग हें आंतल्या जगामुळें आपण पाहत असतों. तें आंतलें जगच अज्ञात असल्यावर बाहेरचें जग तें काय उमजणार! आपली आवड-निवड, आपल्या इष्टानिष्टतेच्या कल्पना, आपले सत्य-असत्याचे सिद्धान्त, आपली जगाच्या उत्पत्तीविषयींची कार्यकारणमीमांसा आणि धर्म—ईश्वराबद्दलची श्रद्धा ह्या सर्वांचें उगमस्थान हें आंतलें जग आहे. प्रत्येक व्यक्ति जी प्रौढ बनते ती ह्या जगामुळेंच. प्रत्येक व्यक्तींत










व्यक्तिमत्त्व नांवाची जी गुणप्रधान चीज असते तिचें प्रेरक स्थान हें जगच होय. प्रत्येक प्रौढ माणसास भोंवतालच्या अंतर्गत आणि बहिर्गत वस्तुमात्राचें अस्तित्व तो त्याचा विचार करतो म्हणून असतें. त्यानें त्या त्या वस्तूचा विचार थांबविला कीं, त्याच्यापुरतें त्या त्या वस्तूचें असणें संपलें–आणि हें आंतलें जग कळलें नाहीं तर जें कळतें असें भासतें तेंच कळेनासें होतें. याचकरितां दृश्य अदृश्य असतें. ' माया ' म्हणून आपल्या येथील वेदान्ती विचारवंतांनीं जिला म्हटलें ती ह्याच आंतल्या जगाच्या अज्ञानामुळें उद्‌भूत झालेली होय. याचकरितां भारतीय तत्त्वज्ञानांत आत्मज्ञानावर मूळ भर आहे.

**' शब्दसृष्टीचे ईश्वर '**

मनुष्य हा शिकणारा प्राणी खरा; परंतु त्याचें शिकणें हें विचाराशीं अविभाज्यपणें संलग्न आहे. किंबहुना विचार हें मानवाच्या शिकण्याचें प्रेरणास्थल आहे. ह्या दृष्टीनें मानवाला विचार करणारा प्राणी असेंहि म्हणतां येईल. असें असलें तरी प्रथमावस्थेंत आणि प्रौढावस्थेंत विचार आणि शिकणें यांचे संबंध परस्परपूरक आहेत हें विसरून चालणार नाहीं. प्रेरणा मात्र केवळ विचाराचीच किमया होय. याचाच अर्थ असा कीं, ज्ञानसाधनेंत शेवटीं विचारांनाच महत्त्व आहे. मग विचारांचा विचार करणें अपरिहार्य ठरतें. आणि असें करतांना पहिली गोष्ट जी नजरेसमोर येते ती म्हणजे भाषा. इतर प्राण्यांच्या वेगवेगळ्या भाषा आहेत असें दाखविण्याच्या मागें आजचे संशोधक जरी असले, तरी विचाराचें माध्यम ह्या दृष्टीनें भाषा ही केवळ माणसाचीच मिरासदारी आहे. या ठिकाणीं कुणाच्याहि मनांत असा प्रश्न निर्माण होणें शक्य आहे कीं, भाषा हेंच एक विचार करण्याचें माध्यम आहे काय? तसें असेल तर संगीतज्ञ, चित्रकार व शिल्पकार आणि नृत्य करणारे हे कोणत्या माध्यमाच्या साहाय्यानें आपापल्या कलांचा विचार करतात? वास्तविक संगीत, चित्र व शिल्प, नृत्य आणि भाषा हीं विचार करण्याचीं माध्यमें असलीं तरी विचार बनण्याचें, ते बनविण्याचें नि घडविण्याचें कार्य केवळ भाषाच करूं शकते. आलेल्या अनुभवांची सुसंगति, त्यांचा अन्वय नि अर्थ आणि त्यांचा व्यवस्थेशीर विस्तार व संक्षेप हीं जीं वैचारिक क्रियेचीं मुख्य अंगें आहेत त्यांचा निकाल लावण्याचें सामर्थ्य भाषेचेंच होय. शिवाय संगीत, चित्र, शिल्प आणि नृत्य ह्या कला अमर असल्या तरी त्यांचीं माध्यमें स्थूल कालानें मर्यादित आहेत. संगीतज्ञ एक विशिष्ट राग एका विशिष्ट कालापुरता छेडतो. चित्रकार एखाद्या व्यक्तीचें एकाद्या प्रसंगांतील एका विशिष्ट वेळचें चित्रण करूं शकतो. शिल्पकाराचें पण असेंच आहे. आणि नृत्याची लय आणि नाद हीं चंचल काळाइतकींच चंचल असतात. परंतु भाषेचें असें नाहीं. भाषा आपल्या लीलेनें सर्व चित्रें, सगळ्या रागदाऱ्या आणि नृत्याचे सारे चमत्कार आणि विलास आपल्या नजरेसमोर उभे करते; एवढेंच नव्हे, तर भाषेचा संचार भूत, वर्तमान आणि भविष्य ह्या त्रिलोकांत केव्हांहि चालूं असतो, चालूं शकतो. अशा ह्या भाषेवर ज्याचें प्रभुत्व अशा कवीस संत रामदासांनीं 'शब्दसृष्टीचे ईश्वर' असें जें म्हटलें आहे तें उगीच नाहीं.

भाषेचें सामर्थ्य एक वेळ कल्पनातीत असेल, पण तें अमर्याद नाहीं. भाषेच्या सामर्थ्यालाहि मर्यादा आहे. जीवनाचा अंतिम अनुभव हा भाषेच्या साहाय्यानें येऊं शकत नाहीं असें मुक्त पुरुषांचें म्हणणें आहे. ह्या अनुभवाखेरीज ज्ञान पूर्ण होत नाहीं. ह्या अनुभवास मन निर्मळ, निरामय आणि समाहित असावें लागतें. स्वच्छ, पारदर्शक मनांतच ब्रह्माचें प्रतिबिंब उमटूं शकतें असें म्हणतात. आणि मनाची ही अवस्था यावयास नि व्हावयास केवळ भाषेचाच त्याग करावा लागतो असें नाहीं, तर मनावरचीं सारीं पुटें नाहींशीं झालीं पाहिजेत. म्हणजे आत्मज्ञान व ब्रह्मज्ञान यास अनुकूल अशी भूमिका तयार होते. ब्रह्मज्ञान नि आत्मज्ञान हीच ज्ञानाची अंतिम अवस्था.

---

मिसेस् ख्रिस्तिन वेस्टन : अनुवादिका—सौ. कमल कामत

# • • • मातीचा घोडा

[ प्रस्तुत गोष्ट वाचून, ही गोष्ट कोणीं हिंदी लेखकानेंच लिहिली असणार असें वाचकाला वाटेल, इतका लेखक गोष्टींतील हिंदी जीवनाच्या वातावरणाशीं अगदीं समरस झालेला आढळतो. गोष्टींतील प्रसंग वाचतांना लेखकाचें सूक्ष्म निरीक्षण सहज नजरेंत भरतें. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, 'नीळ' ही प्रसिद्ध कादंबरी लिहिणारी मिसेस ख्रिस्तिन वेस्टन ही या गोष्टीची लेखिका आहे. तिच्या बालपणची ती एक प्रत्यक्ष घटना आहे. डुप्लेच्या काळीं हिचे आजोबा आणि इतर फ्रेंच मंडळी निळीचे मळेवाले म्हणून प्रथम हिंदुस्थानांत आले. वयाच्या चौथ्या वर्षींच ती गोष्टी आणि कविता लिहूं लागली. पुढें मोठी झाल्यावर ती आपल्या वडिलांना त्यांच्या वकिलीच्या कामांत मदत करीत असे आणि या कामांतच लेखिकेला हिंदी जीवनाची चांगली ओळख झाली. ही गोष्ट 'मॉडर्न रीडिंग' या कथासंग्रहाच्या अकराव्या अंकांत आहे. या गोष्टीचा स्वैर अनुवाद मीं केला आहे. —अनुवादिका ]

अलिगड गांवीं आम्ही राहात असतांनाची गोष्ट. त्या वेळीं मी बारा वर्षांची आणि माझा भाऊ दहा वर्षांचा होता. आम्ही रेल्वेच्या फाटका-( level-crossing ) जवळ विटांनीं बांधलेल्या एका घरांत राहत होतों. त्या वेळचा आमच्या आवडीचा छंद म्हणजे वडील माणसांचा डोळा चुकवून, कोणालाहि सोबतीला न घेतां, सायकल-वरून किंवा पायीं लांब भटकायला जायचें. आमच्याबरोबर गडीमाणूस आला म्हणजे तितकी मजा येत नसे. कारण तो उगीच आम्हांला हटकत राही. अर्थात्, आम्हांला पाहिजे तसें करायला तो अडवूं शकत नसेच; तरी पण तो आमच्या आई-वडिलांच्या कानांवर कांहीं तरी घाली आणि मग आमची मोठी पंचाईत होई.

माझ्या भावाला चित्रकलेचा फार नाद होता. मला त्यांतलें कांहींच गम्य नसल्यामुळें त्याचें मला फार कौतुक वाटे. तो जेव्हां माणसांचीं किंवा जनावरांचीं चित्रें काढी किंवा देखावे चितारीत बसे, तेव्हां त्याचें तें चितारणें बघत बसायला मला आवडत असे. उन्हाळ्याला सुरुवात होण्यापूर्वीं एके दिवशीं आम्ही घरच्या मंडळींना गुंगारा देऊन रेल्वे-फाटकाकडे जाणाऱ्या धुराळ-लेल्या रस्त्यावरून, कुंपणाला लागून असलेलीं शेतें तुडवीत भटकायला गेलों. माझ्या भावाला 'आगगाडी सरळ आपल्या अंगावर येत आहे' अशा धांवत्या गाडीचें चित्र रेखाटायचें होतें ! गाडी सरळ अंगावरून गेल्यावर, तिच्याखालीं सांपडलेल्या लोकांचे तशा स्थितींत काढलेले कांहीं भयंकर फोटो मीं पाहिले होते. त्याची मला आतां आठवण झाली. स्टेशनमास्तरच्या मुलांनीं एकदां अपघाताच्या फोटोंचा रेल्वेचा सरकारी अल्बम आम्हांला दाखविला होता आणि तो पाहून माझ्या भावाला भोंवळ आल्यासारखें झालें होतें. पण आज मात्र बेफिकीरीनें आपले खांदे उडवीत स्वारी म्हणाली, "ऊं ऽ ऽ, आपल्याला त्यांतून निसटतां येईल."

"पण फोटोंतील त्या म्हाताऱ्या बाईला तसं करतां आलं नाहीं" मीं त्याला आठवण करून दिली. "तसंच ज्या माणसाच्या पोटावरून..."

माझ्या भावानें मध्येंच मला थांबविलें आणि म्हटलें, "हें बघ, ज्या वेळीं आगगाडी भरधांव वेगानें रुळांवरून धांवत येते आणि जेव्हां तिला पाहून आपल्या डोक्यांत विचित्र कल्पना गर्दी करूं लागतात, अशा वेळच्या आगगाडीचें रूप चितारायचें आहे मला."

"पण भावनांचं कांहीं चित्र काढतां येत नसतं !" मीं त्याला अडविलें.

"तुला नाहींच येणार, पण मला येईल" भावानें उत्तर दिलें.

माझा भाऊ अगदीं हट्टी होता ! पण 'आग-गाडी स्वतःच्या अंगावर येत आहे' असें चित्र







काढण्याचे त्याचे प्रयत्न सफल होण्याचा रंग दिसेना. तेव्हां अखेर 'आतां पुरें झालं तुझं' असें मीं म्हटल्यावर आम्ही परतूं लागलों. धूळ आमच्या पायतणावर माखली जात होती आणि आमच्या पांढऱ्या हॅट्स् सूर्यामुळें तापून निघत होत्या. आगगाडी रस्ता ओलांडून जाते त्या ठिकाणीं दोन ठेंगण्याशा पांढऱ्या दारांचें फाटक होतें. गाडी तेथून जात असतांना तीं बंद केलीं जात. फाटकाच्या ज्या बाजूला आम्ही राहात होतों तेथें एक माणूस त्या फाटकावर देखरेख करण्यासाठीं असे. त्या माणसाच्या कुटुंबांतील मंडळींची आणि आमची साधारण तोंडओळख झालेली होती.

आज त्या राखणदारानें विटकासा निळा कोट घातला होता. कमरेला रुंद चामडी पट्टा आवळला होता आणि डोक्याला तांबडा फेटा बांधला होता. रेल्वेमधील खालच्या नोकरवर्गाचा तो पोशाखच होता. दोन आगगाड्यांच्या मधल्या वेळांत, घराच्या दारांत बसून तो चिलीम ओढीत बसे व त्याची नायको आंत दुपारचें स्वयंपाकपाणी करीत असे.

आम्हीं घराच्या मागच्या बाजूला जाऊन रेल्वेबांधाकडे जाण्यासाठीं डाव्या बाजूला वळलों. तेथें केराच्या ढिगाजवळ, चुना लावलेल्या एका भिंतीला टेकून बसलेला रखवालदाराचा मुलगा दिसला. यापूर्वीहि आम्हीं त्याला पाहिलेला होता; पण नेहमीं दुरूनच! पण त्या दिवशीं त्याला पाहिल्यावर त्याच्यांत आम्हांला काय एवढें दिसलें कोण जाणे! पण तेथें थांबून आम्हांला त्याच्याकडे बघत राहावेंसें वाटलें खरें. तो अदमासें सहा वर्षांचा असावा. कमरेला गुंडाळलेल्या एका वारभर पांढऱ्या कपड्याशिवाय त्याच्या अंगावर दुसरें कांहींच नव्हतें. लहान मुलांना सहज जमणारी, अर्धवट उकीडवी बैठक घालून तो बसला होता. एक पाय त्यानें स्वतःच्या अंगाखालीं दुमडून घेतला होता आणि दुसरा गुडघ्यांत वांकवून सरळ जमिनीवर उभा ठेवला होता. आजूबाजूच्या जगाला संपूर्णपणें विसरून, शांत चित्तानें तो कशांत तरी मग्न होता. आमचें लक्ष त्याच्याकडे वेधलें गेलें.

"काय करीत आहेस तूं?" मीं त्याला हिंदुस्थानींत विचारलें. त्यानें वर पाहिलें. पण आमच्यापासून दूर पळून न जातां किंवा लाजून मार्गेमागें न सरकतां तो तसाच बसून राहिला. इतकेंच नव्हे तर, आपल्या त्या मोठ्या काळ्याभोर आणि पाणीदार डोळ्यांनीं आमच्याकडे टक लावून पाहूं लागला. त्याचा चेहरा कांहींसा लांबट पण गोल होता. ओठ तांबडेलाल होते. डोक्याचा तुळतुळीत गोटा केलेला आणि त्यावर फक्त शेंडीची बट होती. माझ्या प्रश्नाला त्यानें आपल्या गंभीर पण नाजूक आवाजांत उत्तर दिलें, "मी माझ्या घोड्यासाठीं राजवाडा तयार करीत आहे."

"तुझा घोडा?" आम्हीं दोघांनीं एकदम विचारलें. त्यानें एक लहानशी मातीची वस्तु उचलून आपल्या तळहातावर उभी करून ठेवली.

माझ्या भावानें त्याला विचारलें, "काय रे, तुझा घोडा इतका लठ्ठ कसा? आणि हें रे काय? त्याचा एक पाय बाकीच्या पायांपेक्षां असा लांब कां केला आहेस?"

त्या लहान मुलानें शांतपणें उत्तर दिलें, "लठ्ठ आहे, कारण ती घोडी आहे आणि लवकरच तिला शिंगरूं व्हावयाचें आहे."

यावर आम्ही हंसलों. मग माझा भाऊ म्हणाला, "आपल्याला तर हा अगदीं बेढब दिसतो बुवा. छी छी! कसला घोडा हा!"

त्या मुलानें आश्चर्यानें विचारलें, "खरंच! हा बेढब आहे म्हणतां?"

"तर काय! ज्याचा एक पाय बाकीच्या पायांपेक्षां लांब आहे, असा घोडा तूं तरी कधीं कुठें बघितला आहेस का?"

"हो, हो!" असें ठसक्यांत म्हणत तो मुलगा उठला व शांतपणें मातींत पाणी घालून घट्टसा चिखल तयार करूं लागला.

थोडा वेळ थांबून माझ्या भावानें पुन्हां विचारलें, "हें पाहा, एक पाय लांब असलेला असा घोडा तूं पाहिलास तरी केव्हां?"

"हा बघा माझ्या हातांत आहे. बघा, बघा तरी!" असें म्हणत त्या मुलानें तो घोडा आमच्यापुढें धरला.








"हाच होय ? बरं, तें राहूं दे. पण मातीच्या घोडीला शिंगरूं झालेलं कधीं कोणीं पाहिलंय् का ? तुझी घोडी अजब दिसते बुवा !"

वर न बघतांच त्या मुलानें उत्तर दिलें, "पुरे दिवस भरले कीं त्या घोडीला शिंगरूं नक्की होईल."

"मूर्ख कुठला !" माझा भाऊ त्याला म्हणाला. एवढें म्हणून बाजूच्या बांधावरील पायवाटेनें आम्ही चालूं लागलों. बांधाखालीं आगगाडीची डबल लाईन गेलेली होती. कारण, या ठिकाणीं संयुक्त प्रांतांतील शहरें ओरिसा आणि बिहारला जोडण्यासाठीं रेल्वेचें ब्रॉड गेज होतें. रूळ उन्हानें चमकत होते आणि दोन्ही बांधांच्या बाजूला ज्वारी-बाजरीचीं आणि कडधान्याचीं शेतें उभीं होतीं. दुसऱ्या बाजूच्या बांधापलीकडे एका बाभळीच्या झाडाजवळ तीन उंट चरत होते व त्यांचे मालक जवळच सावलींत झोंपले होते.

आम्ही फार दूर गेलों नसूं ; एवढ्यांत मीं मागें वळून पाहिलें तर तो पहारेकऱ्याचा मुलगा आमच्या मागून धांवत येत होता. त्यानें आम्हांला गांठलें तेव्हां त्यानें हातांत अलगद धरून आणलेली घोडी आम्हांला दिसली.

"काय पाहिजे तुला ?" आम्हीं थोडें दटावूनच त्याला विचारलें. आमच्यापेक्षां लहान मुलांना आम्ही अशाच सुरांत दटावीत असूं.

"मी तुमच्याबरोबर येऊं का ?"

"छे, छे ! तूं फार लहान आहेस" माझा भाऊ त्याला म्हणाला.

"नाहीं ! नाहीं ! मी चांगला मोठा आहे."

"तीन वर्षांचा असशील फार तर" मीं मोठेपणाचा आव आणून म्हटलें.

त्यावर डोकें हालवीत तो म्हणतो, "माझें वय चौतीस आहे !" त्याच्या त्या उत्तरानें आम्हांला हंसूंच कोसळलें. आणि आम्हीं विचार केला कीं, कांहीं नाहीं तरी ह्या बावळटाला चिडवून आपल्याला थोडा वेळ चांगली गंमत तर करतां येईल !

"अच्छा ! तूं चल आमच्याबरोबर आणि हा छोटा साहेब आगगाडीचें चित्र काढतोय् तें पाहात राहा. मात्र तूं मधें कांहीं लुडबूड करायची नाहींस. नाहीं तर आम्ही तुला चांगला ठोक देऊं."

तो हंसला आणि रस्त्याकडे मानेनेंच खुणावीत म्हणाला, "गाडीची वाट पाहायला ही चांगली जागा आहे. येथून गाडी खूप दुरून येतांना दिसेल."

बघतां बघतां त्या पोरट्यानें आपलें इवलेसें शहाणपण दाखवायला सुरुवात करून आमचा वाटाड्या बनण्याचें ठरविलें आणि आम्हीं पण त्याचा उपदेश ऐकायचा असें ठरविलें. रस्त्याच्या कडेला एक खुरटलेलें बाभळीचें झाड होतें, त्याखालीं आगगाडी-ची वाट पाहात आम्ही बसलों. तेवढ्या वेळांत त्या मुलानें आपलें नांव कल्लू असल्याचें, तसेंच आपण आईबापांचा एकुलता एक मुलगा असल्याचें आम्हांला सांगून टाकलें.

"तूं जन्मलास तेव्हांपासूनच तुझें वय चौतीस वर्षांचें आहे हें जेव्हां तुझ्या आईवडिलांना कळलें असेल, तेव्हां त्यांना फार नवल वाटलें असेल, नाहीं ?" मीं म्हटलें.

आपले लहान काळे खांदे उडवीत तो म्हणाला, "उं ऽ हूं ! त्यांना मुळींच नवल वाटलें नाहीं."

त्याच्याशीं वाद घालण्यांत कांहीं अर्थच नव्हता. इकडे माझ्या भावानें आगगाडीचे रस्ते, तारेचे खांब आणि क्षितिज रेखाटायला सुरुवातहि केली. त्याच्याजवळ तो मुलगा बसला. शेवटीं कल्लूनें विचारलेंच, "तुम्ही इतक्या बारीक आणि वांकड्यातिकड्या रेघा कशाला हो काढतां ?"

"मूर्खा, अरे त्या तर वस्तूंचा बाहेरचा आकार दिसतो ना, त्याच्या रेघा आहेत."

"पण मी जेव्हां मातीचें कांहीं बनवितों तेव्हां त्याच्या पोटांतलेंहि बनवितों. माझी ही घोडीच पाहाना ! आणि माझ्या घरीं मीं केलेल्या गाई, शेळ्या आणि माणसें आहेत, त्या सगळ्यांना पोट असतें."

आम्ही त्रासून जाऊन गप्पच बसलों. लगेच कल्लू तेथून निघून बांधावरून खालीं रेल्वेच्या रुळांकडे गेला. जातां जातां तो म्हणाला; "मी त्या नदीवरून माझ्या या घोडीला पाणी पाजून आणतों."

"ए पोरा, तिकडे कुठली रे नदी ? आणि का रे, तुझी घोडी तर मातीची, ती पाणी रे








कसची पिणार ? तूं मात्र गाडीखालीं सांपडशील." मीं त्याला हटकून म्हटलें.

पण त्यानें माझ्याकडे दुर्लक्ष केलें आणि तो तसाच पुढें गेला. लांबवर जाऊन रुळांखालीं अंथरले-ल्या एका फळीवर तो उकिडवा बसला. जवळच त्यानें आपली घोडी उभी केली. आमच्या डोक्या-वरील तारा सळसळत होत्या आणि सुंदर रंगदार फुलपांखरें आमच्या पायांजवळील गवतावर बागडत होतीं. बाभळीच्या फुलांचा वास हवेंत दरवळला होता. नंतर आम्हांला एक आवाज ऐकूं आला आणि फार दूरवर रूळ चकाकतांना दिसत होते तेथें आगगाडी दिसली.

"कल्लू ! कल्लू ! गाडी आली बघ" मी ओरडलें.

"अजून खंडीभर वेळ आहे" माझा भाऊ म्हणाला. तो आपल्या चित्र काढण्याच्या नादांतच चूर होता.

बघतां बघतां आगगाडी मोठी दिसूं लागली. गाडीमागें आकाशांत धुराचे लोट दिसत होते. मी पुन्हां ओरडलें, "कल्लू ! इकडे ये, पळ !"

जागेवरून यत्किंचितहि न सरकतांच तो म्हणाला, "घाबरूं नका. अजून वेळ आहे."

ती कलकत्ता मेल होती. भयंकर वेगानें धांवत होती. सूर्यानें गाडीचा धातूचा भाग चकाकत होता. गाडी मोठ्यानें ओरडली आणि सूर्यप्रकाशित जागेवरून आवाज क्षरदिशीं निघून गेला. 'कल्लूऽऽ' असें ओरडत मीं जागच्या जागीं उडी मारली.

सगळ्या वातावरणांत वेग आणि धडक भरली होती. या धडकीमुळें मागचेंपुढचें सारें निपचित वाटत होतें. एकाच क्षणापूर्वीं आगगाडी पुष्कळ मैल दूर वाटत होती. पण दुसऱ्याच क्षणीं ती चकाकणारी, काळी, कुरूप, राक्षसी, कानठळ्या बसविणारी कर्कश आरोळी ठोकून भेडसावीत आमच्यावर चालून आली होती ! घाबरून आम्हीं थिजल्यासारखें झालों होतों !

"कल्लू !" मी सावध झाल्यासारखी होऊन ओरडलें. तेव्हां त्यानें आमच्याकडे तोंड वळविलें आणि बांध चढून तो आमच्याकडे आला. मग मीं मूर्खांसारखें त्याला विचारलें, "आणि तुझी घोडी ? तूं तुझ्या घोडीला विसरलास वाटतं ?"

त्यानें लगेच तोंड फिरविलें. उडी मारून पुन्हां तो रुळांवर उतरला आणि मातीची घोडी उचला-यला वांकला. त्या क्षणींच आगगाडी तेथें येऊन थडकली. तिचा भक् भक् चा भयंकर श्वासोच्छ्वास कानावर आदळला. 'धाड्धाड्, धाड्धाड्' च्या हादऱ्यानें आम्ही दचकून मागें सरकलों. चकाक-णाऱ्या लोखंडी पट्ट्यांमुळें व चमकणाऱ्या चाकांमुळें आमचे डोळे फिरूं लागले आणि त्यांचा आवाज ऐकून आम्ही जमिनीवर आदळलोंच. आणि हें सर्व घडतांना आम्हीं कल्लूची बालिश पण कर्कश किंकाळी ऐकली आणि निमिषार्धांत कल्लू त्या भयाण चाकांखालीं आम्हांला दिसेनासा झाला.

आमचे पाय जागच्याजागीं खिळल्यासारखे झाले व आम्ही लांबच्या लांब एखाद्या पलटणी-सारख्या उभे राहिलेल्या आगगाडीच्या डब्यांकडे पाहात राहिलों. आंतील माणसें खिडक्यांतून डोकावून बाहेर पाहत होतीं. कांहींनीं आमच्याकडे पाहून हात हालविले, पण आम्हीं कांहीं उलट तसें खुणावलें नाहीं. पायांखालची धरणी डोलते आहे आणि वरून आकाश माझ्या डोक्यावर रेटलें जात आहे असा मला भास झाला. आतां समोर काय दिसणार हें माहीत असल्यामुळें डोळे उघडून बघण्याचा मला धीर होईना. अशा गोष्टी मीं या-पूर्वींहि पाहिल्या होत्या. पण त्या साऱ्या चित्रांतून किंवा कल्पनासृष्टींत ! पण आतांची ही घटना ! हा सगळा माझा दोष होता. सर्वस्वीं माझीच चूक होती.

गाडी निघून गेली आणि सर्वत्र शांतता पसरली. त्यानंतर किती वेळानें कुणास ठाऊक, मीं एक-दांचे डोळे उघडले. माझ्या भावाचा चेहरा पांढरा फटफटीत पडला होता. तो माझ्याजवळच भीतीनें जरासा वांकून उभा होता. रेल्वेच्या रुळांपलीकडे कल्लू उभा राहिलेला आणि आमच्याकडे पाहून हंसत असलेला आम्हांला दिसला.

"काय हो !" त्यानें आनंदानें हांक मारली. "काय ! झालं का आगगाडीचं चित्र काढून ?"








पलीकडच्या बांधावरून तो उडी मारून खालीं उतरला व गरम रूळ तुडवीत पुढें आला आणि आमच्या बाजूच्या बांधावरून चढून येऊन आमच्या-समोर येऊन उभा राहिला. त्याच्या चेहऱ्यावर मोठ्या खुषीची चमक होती. " मला चित्र दाखवा कीं ! "

माझा भाऊ आतां नीट ताठ उभा राहून म्हणाला, " आम्हांला वाटलं कीं तूं गाडीखालीं चेंगरलासच. "

" चेंगरलों ? " कल्लू आश्चर्यानें बघूं लागला.

" मीं तुझी किंकाळी ऐकली. "

" किंकाळी ? पण मी ओरडलों नाहींच मुळीं. "

" तूं नक्कीच ओरडलास " माझा भाऊ चांचरत जोरानें त्याला बोलूं लागला. " तूं किंकाळी मारली नाहींस ? काय सांगतोस ! आम्हीं दोघांनीं ती ऐकली. "

" अहो नाहीं. तो मी नव्हे. ती माझी घोडी होती. ती बेटी आगगाडी पाहून घाबरून गेली होती." तो आळीपाळीनें आमच्याकडे पाहूं लागला. त्याच्या डोळ्यांत गंभीरता आणि मृदुता सामावलेली दिसली. " तुम्ही घाबरलांत ना ? तशीच माझ्या घोडीलाहि भीति वाटली. फक्त मला एकट्यालाच काय ती भीति वाटली नाहीं. "

माझ्या भावाला राग आणण्याला त्याचें हें बोलणें पुरेसें होतेंच. त्यानें कल्लूच्या हातांतील घोडी हिसकावून घेतली आणि जमिनीवर आपटून त्याच्या चार ठिकऱ्या उडविल्या. एक क्षणभर आम्ही शांत आणि स्तब्ध उभें राहिलों. कल्लूनें अजिबात प्रतिकार केला नाहीं. उलट, अगदीं शांतपणें आमच्या पायाशीं पडलेल्या तुकड्यांकडे बोट दाखवीत तो पुटपुटला 'बघा, तें घोडीचें शिंगरूं पाहा ! '

त्या फुटक्या तुकड्यांच्या मध्येंच एक लहानसा मातीचा घोडा पडलेला होता. घोडीच्या पोटांत तो होता व तिच्यासारखाच पण अगदीं प्रमाणबद्ध मात्र होता. चारी पाय एकसारखे आणि सारख्याच आकाराचे घडविलेले होते. कल्लूनें तो उचलला आणि आपल्या हातावर ठेवला.

" मीं तुम्हांला सांगितलें नव्हतें ! " कल्लू प्रसन्न चित्तानें बोलूं लागला " मीं म्हटलेंच होतें कीं ह्या घोडीला एक छान शिंगरूं होणार म्हणून ! "

ही विलक्षण गोष्ट घडल्यानंतर थोड्या दिवसांनींच आम्ही सारे उन्हाळ्यांत थंड हवेच्या ठिकाणीं राहायला गेलों. त्यानंतर कल्लूची व आमची पुन्हां भेट झाली नाहीं. या देशांत तसे कोट्यवधी लोक आहेत ! त्यांतलाच एक कल्लू ! पण त्याचें पुढें काय झालें असावें याबद्दल मात्र मला नेहमींच हुरहूर वाटत राहिली.

---

## आज उजळली आहे—!

आज उजळली आहे
निळी आभाळी दुपार
त्यांत धारा प्रकाशाच्या
पाझरती झरझर
नवलाईत हिरव्या
वारा करी चुळबूळ
शेतीं पांखरांच्या कंठीं
फुले तृप्त किलबिल
शान्त धरित्री माउली
भोगी सुख सार्थकांत

नाहीं तिचिया संसारीं
कोणी उपाशी वंचित
शान्त विशाल नभाची
आज प्रज्ञा स्थिरावली
आप्तकाम, विश्वावर
घाली वत्सल साऊली !
चल माझ्या हृदया रे !
आज उन्हांत या न्हाऊं
आणि अतृप्त लोचनीं
तृप्ति सांठवून घेऊं !

—सरिता पदकी

प्रा. देवदत्त अ. दाभोलकर

# भारताची पहिली पंचवार्षिक योजना

दुसऱ्या महायुद्धाच्या पूर्वीच्या कालखंडांतहि भारतीय आर्थिक व्यवस्थेसाठीं नियोजनाची आवश्यकता भारताच्या राजकीय नेत्यांनीं मान्य केलेली होती. श्री. जवाहरलाल नेहरु यांच्या अध्यक्षतेखालीं काम करणाऱ्या 'नॅशनल प्लॅनिंग कमिटी'नें भारताच्या आर्थिक विकासाच्या सर्व अंगोपांगांचा विचार करुन, त्यांवरील आपले अहवाल प्रसिद्धहि केले होते. युद्धकाळांत नियोजनविषयक कल्पनांचा अधिकच प्रचार झाला. भांडवलदारांनीं पुढें मांडलेली 'मुंबई-योजना' ( Bombay Plan ), रॅडिकल डेमॉक्रॅटिक पक्षानें आंखलेली 'जनता-योजना' ( Peoples' Plan ) व गांधीजींच्या आर्थिक विचारांना अनुसरुन असल्याचा दावा सांगणारी 'गांधीवादी योजना' ( Gandhian Plan ) अशा तीन वेगवेगळ्या योजना प्रामुख्यानें लोकांपुढें चर्चेसाठीं म्हणून आल्या. या सर्व योजनांतून अर्थातच केवळ ढोबळ आंकड्यांचीच चर्चा असणें शक्य होतें. 'नॅशनल प्लॅनिंग कमिटी'ला निरनिराळ्या विषयांतील तज्ज्ञांचें साहाय्य मिळालेलें होतें व त्या कमिटीनें बऱ्याचशा चिकाटीनें आपले संपूर्ण अहवाल तयार करण्याचा प्रयत्नहि केला होता. परंतु एक तर, अजूनहि नियोजनासाठीं आपल्याला हवी असलेली सर्व आंकडेवार माहिती भारतांत नीटपणें उपलब्ध नाहीं. युद्धपूर्वकालांत तर ही अडचण विशेषच होती. त्याखेरीज सरकारच्या साहाय्याच्या अभावीं 'नॅशनल प्लॅनिंग कमिटी'ला सहजपणें उपलब्ध होऊं शकणाऱ्या माहितीवरच आपली गुजराण करावी लागली. यामुळें नियोजनाच्या चर्चेला चालना देण्याच्या दृष्टीनें जरी हे अहवाल उपयोगी पडले, तरी प्रत्यक्ष नियोजन हातीं घ्यावयाच्या दृष्टीनें मात्र त्यांचा कांहींच उपयोग नव्हता.

युद्ध संपलें. स्वातंत्र्य मिळालें. देशाची विभागणी झाली. जागृत जनता एका किमान जीवनमानाची अपेक्षा ठेवूं लागली. जनतेच्या मनांतील ही अपेक्षा केवळ भारतांतच निर्माण झाली असें नाहीं. तर अखिल आशिया खंडांत जनतेच्या जीवनमानाचा प्रश्न हा एक निकडीचा प्रश्न होऊन बसला. नियोजनबद्ध आर्थिक विकासावरील जनतेची श्रद्धा वाढीस लागली होती. नियोजनाखेरीज देशाच्या फाळणीमुळें अधिकच बिकट झालेले भारताचे आर्थिक प्रश्न सुटूं शकणार नाहींत, ही गोष्टहि स्पष्ट दिसत होती. भारतीय अर्थव्यवस्थेंतील भांडवलशाही स्वयंविकासाची शक्ति सरत आल्याचा अनुभव फाळणीपूर्वीच्याच काळांत येऊं लागला होता. संरक्षित उद्योगधंद्यांत करुन दाखविलेला विकास हेंच भारतीय भांडवलदारांचें आजवरचें कर्तृत्व होतें. संरक्षणाच्या आधारावर भारतीय बाजारपेठ काबीज करुन हा विकास पुढें खुंटला होता. युद्धकाळांत चलनवाढीमुळें भाव चढत असतांहि आपल्या भांडवलदारांनीं नवीन उद्योगधंदे सुरुं करण्याची धडाडी दाखविली नाहीं. कांहीं उद्योगधंद्यांच्या बाबतींत यंत्रसामग्रीची अडचण उभी असे. युद्धकाळांत यंत्रसामग्री आयात करणें शक्य नव्हतें. परंतु आयात यंत्रसामग्रीची आवश्यकता नसलेल्या इतर क्षेत्रांतहि, आपल्या भांडवलदारांनीं धडाडीनें पुढें पाऊल टाकलें नाहीं. एक प्रकारची कुचंबणेची अवस्था भारतीय अर्थव्यवस्था त्या वेळीं अनुभवीत होती. राजकीय पारतंत्र्य हें या कुचंबणेचें एक कारण होतें. परंतु केवळ त्याच आडकाठीमुळें सर्व अडून राहिलें होतें, असें मात्र नव्हे. सार्वत्रिक विकासांतून प्रत्येक अंगोपांगाला मिळणारा जोम आपल्या अर्थव्यवस्थेस पाहिजे होता. या गोष्टीसाठीं नियोजन अपरिहार्य होतें. फाळणीनंतर ओढवलेल्या बिकट परिस्थितीनें तर ही गोष्ट अधिकच स्पष्ट झाली. केवळ उपासमार टाळण्यासाठींहि आपल्याला बाहेरुन अन्नधान्य आयात करणें भाग पडूं लागलें. शेतीप्रधान राष्ट्राला ही केवळ नामुष्कीचीच नव्हे, तर धोक्याचीहि परिस्थिति होय. औद्योगीकरणासाठीं यंत्रसामग्रीची आयात करणें तर दूरच राहिलें, परंतु अन्नधान्याच्या आयातीची किंमत कशी पुरी करावी, हाच आपल्यापुढें येऊन उभा राहिला.

युद्धकाळांत सांठलेल्या स्टर्लिंग गंगाजळीचा मुख्यत्वें-करून याच कामासाठीं विनियोग होऊं लागला. परंतु असें सांठवणीचें पाणी किंवा अमेरिकेकडून प्रसंगवशात् देणगी म्हणून मिळणारी दानाची भाकरी ही किती दिवस पुरणार ? आणि हा झाला केवळ पोट भरण्याचा प्रश्न. आर्थिक अभ्युदय तर पुढेंच राहिला !

निरनिराळ्या राज्यसरकारांनीं युद्धकालांतहि आपल्या कांहीं आर्थिक विकासाच्या योजना आंखल्या होत्या. त्यांपैकीं कांहीं हातींहि घेण्यांत आलेल्या होत्या. परंतु त्यांत राष्ट्रीय नियोजन नव्हतें. संपूर्ण देशाच्या दृष्टीनें एकसूत्रीकरण नव्हतें. योजनांच्या कमी-अधिक महत्त्वाचें तारतम्यपूर्वक मूल्यमापन नव्हतें. सर्वांगीण आर्थिक विकासाशीं त्यांची योग्य प्रकारें सांगड घालण्यांत आलेली नव्हती. आय, व्यय, विकासाची गति यांच्यांत योग्य सुसंवादिता नव्हती. थोडक्यांत म्हणजे फुटकळ तुरळक योजना होत्या, आंखीव-रेखीव सुसंबद्ध नियोजन नव्हतें !

## पहिला आराखडा व आतांची योजना

असें नियोजन सिद्ध करण्यासाठीं मार्च १९५० मध्यें नियोजनमंडळाची स्थापना करण्यांत आली. राष्ट्रांतील एकूण साधनसंपत्तीचा आढावा घेऊन, राष्ट्राच्या आर्थिक अभ्युदय कोणत्या मार्गानें, क्रमानें व गतीनें साधतां येईल यांविषयीं निश्चित सूचना करण्याचें काम या मंडळाकडे सोंपविण्यांत आलें होतें. आपल्या पंचवार्षिक योजनेचा ( एप्रिल १९५१ ते मार्च १९५६ ) पहिला आराखडा नियोजनमंडळानें जुलै १९५१ मध्यें सादर केला. यानंतरच्या कालखंडांत या आराखड्यावर बरीच साधकबाधक चर्चा झाली. नियोजनमंडळालाहि अधिक निश्चित व तपशीलवार अशी माहिती गोळा करावयास सवड मिळाली व अंतिम स्वरूपांत आतांची योजना डिसेंबर १९५२ मध्यें प्रसिद्ध करण्यांत आली. या योजनेंतहि परिस्थिति व अनुभव यांच्या अनुषंगानें बदल होणारच नाहींत असें नाहीं. कितीहि कसोशीनें केलेल्या नियोजनांत असे फेरबदल पुढें कालक्रमानें करावेच लागतात. परंतु आजच्या परिस्थितींत करतां येण्यासारखा आहे तेवढा आराखडा आतां निश्चित झाला आहे, असें समजावयास हरकत नाहीं. पहिला आराखडा व आतांची योजना यांतील फरक स्थूलमानानें पाहूं.[१]

आतांच्या योजनेंत एकूण खर्चाची रक्कम १४९३ कोटी रुपयांपासून २०६९ कोटींपर्यंत म्हणजे ५७६ कोटींनीं वाढली आहे. त्याचप्रमाणें पहिल्या आराखड्यांत एकूण खर्चापैकीं १२·८ टक्के खर्च शेतीसाठीं दिलेला होता तें प्रमाणहि नवीन योजनेंत १७·४ टक्क्यांपर्यंत वाढविलें आहे. परिस्थितींत बदल पडल्यास पुनर्वसनासाठींहि अधिक पैसा खर्च करावा लागेल, याचीहि जाणीव नियोजकांनीं ठेविली आहे. प्रतिवर्षीं दुष्काळाची छाया भारतांत कोठें ना कोठें तरी पडलेलीच असते. दुष्काळ-साहाय्यासाठीं म्हणूनहि १५ कोटी रुपयांची तरतूद करण्यांत आलेली आहे.

---

१. पंचवार्षिक खर्च ( आंकडे कोटी रुपयांचे )

| | आतांची योजना | पहिला आराखडा |
|---|---|---|
| शेती व समाजविकास योजना | ३६०·४३ | १९१·६९ |
| पाटबंधारे, धरणें व वीज | ५६१·४१ | ४५०·३६ |
| वाहतूक व दळणवळण | ४९७·१० | ३८८·१२ |
| उद्योगधंदे | १७३·०४ | १००·९९ |
| सामाजिक सुखसोयी ( आरोग्य, शिक्षण इ० ) | ३३९·८१ | २५४·२२ |
| पुनर्वसन | ८५·०० | ७९·०० |
| इतर | ५१·९९ | २८·५४ |
| एकूण | २०६८·७८ | १४९२·९२ |








याखेरीज नवीन योजनेंत नव्यानेंच अंतर्भूत झालेल्या गोष्टी पुढीलप्रमाणें : ( १ ) समाजविकास योजनां-( Community Development Projects )साठीं ९० कोटी रुपये, ( २ ) आद्यमहत्त्वाच्या उद्योगधंद्यांसाठीं ( -पोलाद, विद्युत्-उपकरणें, खत-कारखाने-) ५० कोटी रुपये, ( ३ ) मलेरिआ-प्रतिबंधक उपायांसाठीं १० कोटी रुपये, ( ४ ) समाजसेवक-संघटनांसाठीं ४ कोटी रुपये, ( ५ ) सामाजिक-आर्थिक प्रश्नांच्या संशोधनासाठीं ५० लक्ष रुपये, ( ६ ) पहिल्या प्रतीच्या बंदरांची उपयुक्तता वाढविण्यासाठींहि खर्चाची तरतूद केलेली आहे.

ही योजना व यापुढील इतर योजना कालक्रमानें पूर्ण झाल्यानंतर सुमारें २७ वर्षांच्या कालावधींत ( सन १९७७ मध्यें ) भारताचें सरासरी माणशीं उत्पन्न दुप्पट व्हावें, अशी नियोजनमंडळाची अपेक्षा आहे. या कालांत अर्थात् लोकसंख्येचीहि वाढ झालेली असेल हें नियोजनमंडळानें गृहीत धरलेलें आहे. ही वाढ गृहीत धरून सरासरी डोईं उत्पन्न दुप्पट व्हावयास आजच्या राष्ट्रीय उत्पन्नांत १६० टक्क्यांची वाढ व्हावयास पाहिजे. ती तशी करतां येईल असा नियोजनमंडळाचा विश्वास आहे.

आधींच सांगितल्याप्रमाणें पहिल्या आराखड्यापेक्षां ही नवीन योजना अधिक रेखीव आहे, अधिक निश्चित माहितीवर उभारलेली आहे व भविष्यकालाविषयीं अधिक उत्साहप्रद असें आश्वासन तिच्यांत आहे. या पिढीला ' याच देहीं याच डोळां ' आपल्या कर्तृत्वाचें कोणतें प्रत्यक्ष फल दिसूं शकेल याविषयींची ग्वाही ही योजना देत आहे. परंतु हें सारें, ही योजना ज्या अनुमानांवर आधारलेली आहे तीं अनुमानें अचूक ठरतील, तरच घडून येण्याचा संभव. राष्ट्राच्या कर्तृत्वशक्तीविषयीं व सहकारी वृत्तीविषयीं नियोजकांनीं ठेवलेली अपेक्षा पूर्ण होण्यावर तर निम्में-अधिक यश अवलंबून आहे. जनतेंतील जागरूक उत्साहावरच योजनेचें यश अवलंबून असतें. ह्या गोष्टीची कितीहि वेळां पुनरुक्ति केली तरी ती अपुरीच वाटावी इतक्या महत्त्वाची ही गोष्ट आहे. परंतु केवळ पुनरुच्चारानें तो प्रश्न सुटण्यासारखा नाहीं. नियोजनमंडळानेंहि त्या प्रश्नाचें स्वरूप मांडून तो तेवढ्यावरच सोडून दिला आहे. आपणहि तसेंच करणें युक्त ठरेल. परंतु त्याच्या महत्त्वाची जाणीव मात्र आपण सदैव मनांत बाळगिली पाहिजे.

### योजनेमागील परिस्थिति व उद्दिष्टें यांचा संदर्भ

आपल्या योजनेचा विचार करतांना तिच्या कांहीं मर्यादांची जाणीव बाळगावयास पाहिजे. या योजनेची यशस्विता अनेक अंतर्गत गोष्टींवर अवलंबून आहे, त्याचप्रमाणें कांहीं बाह्य घटनांवरहि आहे. जागतिक महायुद्धाची शक्यता ही एक अशी अत्यंत मोठी मर्यादा आहे. तिसरें महायुद्ध झालेंच तर जगांतील राष्ट्रांची व त्यांनीं आंखलेल्या योजनांची काय परवड होईल, तें कुणीं सांगावें ? याउलट युद्धाची भीति पूर्णपणें नाहींशी होऊन जागतिक शांतता प्रस्थापित झाली तरी त्यामुळेंहि बिकट आर्थिक प्रश्न निर्माण होण्याचा संभव आहे. आज आपल्या आन्तरराष्ट्रीय हितसंबंधांचे सर्व धागे अखेर अमेरिकेपर्यंतच जाऊन पोहोंचतात. अमेरिकेचें आजचें उत्पादन हें मुख्यत्वेंकरून युद्धाच्या तयारीसाठीं सुरू आहे. युद्धाची भीति नाहींशी झाली तर हें उत्पादन थांबेल, बेकारी निर्माण होईल व मंदीला सुरुवात होईल. आणि अमेरिकेंतील मंदी इतर ऋणानुबंधी राष्ट्रांतून आयात व्हावयास कितीसा उशीर ! युद्धासाठीं उत्पादनाची गरज उरली नाहीं तरी एकूण जागतिक समृद्धीसाठीं अमेरिकेनें उपयुक्त वस्तूंचें, यन्त्रादिकांचें उत्पादन सुरू केलें तर अमेरिकेंत बेकारीचें कारण उरणार नाहीं. त्यांत अमेरिकेचें हित आहे, जगाचेंहि हित आहे व कांहीं काळ हा एकतर्फी दानाचा व्यवहार चालू आहे असें वाटलें, तरी अखेर अमेरिकेचाहि त्यापासून फायदाच होईल. परंतु अमेरिकेला इतका दूरदर्शी सुविचार सुचेलच, असें सांगतां येत नाहीं. युद्धाची भीति पूर्णपणें नाहींशी होण्याचा आजचा संभव इतका अल्प आहे कीं, आपण शांततेच्या आर्थिक परिणामांचा विचारहि करण्याच्या भानगडींत पडत नाहीं. परंतु आपलें नियोजन कोणत्या जागतिक अस्थिर वातावरणांत आपल्याला हातीं घ्यावें लागलेलें आहे हें मात्र वरील विवेचनावरून

स्पष्ट होईल. पाकिस्तानशीं आपल्या असणाऱ्या राजकीय-आर्थिक संबंधांचाहि आपल्या नियोजनावर परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं. युद्धखर्च, निर्वासितांवरील खर्च व आन्तरराष्ट्रीय व्यापारावरील परिणाम या मार्गांनीं हा परिणाम आपल्याला जाणवेल. याहि बाबतींत आजची परिस्थिति अनिश्चित आहे.

लोकशाही व आर्थिक अभ्युदय यांचा समन्वय भारताला साधावयाचा आहे. ही आणखी एक महत्त्वाची मर्यादा झाली. नियोजनामुळें अपरिहार्यपणें कडक नियंत्रण व त्या मागोमाग हुकूमशाही येते असेंहि कांहीं विचारवंतांचें म्हणणें आहे. या वादाच्या तपशिलांत आपल्याला येथें शिरावयाचें कारण नाहीं. परंतु हुकूमशाही राज्ययंत्रणाखालीं नियोजन अधिक सुलभ होतें ही गोष्ट मात्र खरी. हुकूमशाहीला चटकन् निर्णय घेतां येतात, शिक्षा-पारितोषिकें वांटतां येतात व मतामतांच्या गलबल्यांत गोंधळून आपलें कार्य स्थगित करावें लागत नाहीं. परंतु हुकूमशाहीचा मार्ग हा आपला मार्ग नव्हे, असें भारतानें आतांपुरतें तरी निश्चित केलें आहे. लोकशाहीच्या या आग्रहाप्रमाणें परराष्ट्रीय राजकारणांतील आपल्या निःपक्षपाती तटस्थ धोरणाचेहि कांहीं परिणाम अटळ आहेत. हे परिणाम मुख्यत्वेंकरून नियोजनासाठीं लागणाऱ्या परकीय मदतीच्या क्षेत्रांत जाणवतील. याखेरीज नियोजनमंडळापुढें नसलेली आणखी एक गोष्ट नियोजनावर परिणाम घडवून आणील असें दिसतें. ती म्हणजे भाषावार प्रान्तरचनेची संभाव्यता, ही होय. आज आंखलेल्या योजनाच भाषावार प्रांतरचनेनंतर नवीन राज्यसरकारांत विभागून द्यावयाच्या, इतक्या सुगम पद्धतीनें हें कार्य पुरें होऊं शकणार नाहीं. भाषावार प्रान्तरचनेचे इतर फायदे कोणतेहि असोत, चालू नियोजनाच्या व्यवस्थेंत त्यामुळें गोंधळ निर्माण झाल्याखेरीज राहणार नाहीं, हें निश्चित.

पंचवार्षिक योजनेचीं उद्दिष्टें ठरवितांना आपल्याला खालील गोष्टींकडे प्रामुख्यानें नजर ठेवावी लागली, असें नियोजनमंडळानें सांगितलें आहे : ( १ ) पुढील विकासाला पायाभूत होईल अशी योजनेची मांडणी. ( २ ) सरकारी व खाजगी क्षेत्रांतील विकासाची गति व त्या त्या क्षेत्रांत लागणारी साधनसामग्री यांच्यांतील सुसंवादिता. ( ३ ) मध्यवर्ती व घटकराज्यांच्या सरकारांनीं आधींच हातीं घेतलेल्या योजना पूर्ण पाडावयाची निकड. ( ४ ) युद्धामुळें व फाळणीमुळें झालेले अनिष्ट परिणाम दूर करण्याची आवश्यकता.

या सर्व मर्यादा सांभाळून आपलें नियोजन पार पाडावयाचें आहे. ज्या आंकडेवारीच्या आधारानें अंदाज बांधावयाचे असतात ते आंकडेहि पुष्कळशा बाबतींत विश्वसनीय रीत्या आपल्याला उपलब्ध नाहींत. एकूण राष्ट्रीय उत्पन्नाचा आंकडाहि पूर्णपणें विश्वासार्ह नाहीं. आपल्याकडे पुरेसें अन्नधान्य उपलब्ध आहे कीं नाहीं याविषयींचे वादविवादहि पुरेशी माहिती उपलब्ध नसल्यामुळेंच चालू राहूं शकतात. लोकसंख्या, सरकारी आय-व्यय, आंतरराष्ट्रीय व्यापार, मोठे उद्योगधंदे यांखेरीज इतर बाबतींत ढोबळ आंकड्यांवर विसंबूनच आज आपल्याला काम भागवून घ्यावें लागत आहे.

साम्यवादी रशियानें सर्वंकष नियोजन अंमलांत आणून उत्पादनवाढीच्या दृष्टीनें तें यशस्वी करून दाखविलें. परंतु रशियांतील करडी हुकूमशाही व तिचे शासनमार्ग आपल्याला संमत नसल्यानें, त्या प्रयोगाची नक्कल आपल्याला करतां येण्यासारखी नाहीं. आपल्याला शांततेनें, लोकशाहीच्या मार्गानें नियोजन अंमलांत आणावयाचें आहे. खाजगी भांडवलशाहीलाहि आपल्या नियोजनांत स्थान आहे. मागसलेल्या राष्ट्रांनीं युद्धोत्तर काळांत आपल्या विकासासाठीं आंखलेल्या योजनाहि रशियाच्याच धर्तीवर चालल्या आहेत. त्यामुळें त्यांचेंहि अनुकरण आपल्याला अभिप्रेत नाहीं. प्रगत राष्ट्रांनाहि मंदीच्या, युद्धाच्या व युद्धोत्तर अस्वस्थतेच्या काळांत आपल्या अर्थव्यवस्थेंत सुसूत्रता आणण्यासाठीं कांहीं प्रमाणांत नियोजन स्वीकारणें भाग पडलें. परंतु प्रगत राष्ट्रांचा प्रश्न हा आर्थिक विकास साधण्यापेक्षां आर्थिक विकासाला स्थैर्य कसें आणावें व त्याची प्रगतिपरता कायम कशी राखावी अशाच स्वरूपाचा होता. डोळे मिटून भारतानें शिकावा असा धडा त्यामुळें कोणत्याच राष्ट्राकडून भारताला मिळण्यासारखा नव्हता. इतरांच्या








अनुभवांपासून योग्य ते धडे डोळसपणें घेऊनच भारताला स्वतंत्र प्रज्ञेनें आपला मार्ग अनुसरला पाहिजे.

### आवश्यक भांडवलाची उभारणी

उत्पादनांत वाढ करणें व आर्थिक विषमता कमी करणें हीं आपल्या नियोजनाचीं साध्यें असलीं पाहिजेत असें नियोजनमंडळानें म्हटलें आहे. या दोन साध्यांत कधीं कधीं विसंवादहि निर्माण होण्याचा संभव असतो. उदा०—आर्थिक विषमता कमी करण्याच्या प्रयत्नांत खाजगी भांडवलाच्या संचयावर परिणाम होऊन उत्पादन घटण्याची शक्यता निर्माण होते. सुरुवातीला तरी कांहीं दिवस आपल्या राष्ट्रांत उत्पादनवाढीवरच भर दिला जाणें साहजिक आहे, असें नियोजनमंडळानें मान्य केलें आहे. परंतु याबरोबरच आर्थिक समानतेचें ध्येय अनिश्चितपणें लांबणीवर न टाकतां, तें साधण्यासाठीं आवश्यक ते सामाजिक व आर्थिक फेरबदल करण्याची जागरूकता आपण आतांपासूनच दाखवीत राहिलें पाहिजे, ही गोष्टहि नियोजनमंडळानें स्पष्टपणें निदर्शनास आणली आहे.

उत्पादनवाढ हा भांडवल, निसर्गसंपत्ति व श्रमशक्ति यांच्या योग्य समन्वयाचा परिपाक आहे. अप्रगत राष्ट्रांकडे अद्याप उपयोगांत न आणली गेलेली अशी निसर्गसंपत्ति विपुल असते. या संपत्तीचा पुरेपूर उपयोग करून घेणें हेंच तर प्रगतीचें गमक होय. लोकसंख्या पुष्कळ असल्यामुळें शारीरिक श्रमशक्तीचाहि तुटवडा नसतो. परंतु योग्य तशी तज्ज्ञ, हुशार श्रमशक्ति मात्र सहजगत्या उपलब्ध होऊं शकत नाहीं. त्यासाठीं शिक्षणाची जरुरी असते. परंतु मुख्य अडचण भासते ती भांडवलाची होय. हें भांडवल ज्या प्रमाणांत उपलब्ध होऊं शकेल, त्या प्रमाणांत आर्थिक प्रगतीचा वेग राहूं शकतो. हें भांडवल मिळावयाचेहि मार्ग दोनच. एक, अंतर्गत भांडवली बचत व दुसरा, परकीय भांडवलाची आयात. या दृष्टीनें भारतीय योजनेंतील नियोजित व्यवस्था पाहूं.

पंचवार्षिक योजनेच्या कालांत योजनेसाठीं एकूण खर्च २०६९ कोटी रुपयांचा व्हावयाचा आहे. यांपैकीं १२४१ कोटी रुपये मध्यवर्ती सरकारकडून खर्च व्हावयाचे आहेत व उरलेले ८२८ कोटी रुपये राज्यसरकारांकडून उपयोगांत आणले जातील. या खर्चाची उभारणी खालील[२] पद्धतीनें होईल अशी अपेक्षा आहे.

याप्रमाणें या योजनेच्या कालखंडांत सरकारी क्षेत्रांत लागणाऱ्या भांडवलापैकीं १२५८ कोटी रुपयांचें भांडवल मध्यवर्ती सरकार व राज्यसरकारें यांनीं उभें करावयाचें आहे. उरलेल्या ८११ कोटी रुपयांच्या भांडवलासाठीं आपण परकीय मदतीवरच विसंबून आहोंत. यांपैकीं १५६ कोटी रुपयांची मदत आतांपर्यंत आपल्या हातीं आलेली आहे. उरलेली ६५५ कोटी रुपयांची मदत मिळूं शकेल अशी अपेक्षा आहे. ही मदत ज्या प्रमाणांत अपुरी पडेल तेवढ्या प्रमाणांत आपणाला अंदाजपत्रकी शिल्लक वाढविण्यासाठीं प्रयत्न करावे लागतील.

२.

#### खर्चाच्या रकमेची उभारणी

| | मध्य-सरकार | राज्यसरकारें ( जम्मू-काश्मीरसह ) | एकूण |
|---|---|---|---|
| एकूण खर्चाचा विनियोग | १२४१ | ८२८ | २०६९ |
| पैकीं सरकारतर्फें गोळा | | | |
| ( १ ) अंदाजपत्रकी शिल्लक | ३३० | ४०८ | ७३८ |
| ( २ ) भांडवल-उभारणी ( कर्ज वगैरे ) | ३९६ | १२४ | ५२० |
| ( ३ ) मध्य-सरकारकडून राज्यसरकारांना मदत | −२२९ | २२९ | ... |
| एकूण सरकारतर्फें गोळा | ४९७ | ७६१ | १२५८ |
| बाहेरून आजवर मिळालेली मदत | १५६ | ... | १५६ |
| एकूण | ६५३ | ७६१ | १४१४ |








यासाठीं इतर खर्चांचें प्रमाण सरकारला कमी करावें लागेल व करवाढ करून उत्पन्नांतहि वाढ करून घेण्याचा प्रयत्न करावा लागेल. यानंतरहि जी तूट राहील ती भरून काढण्यासाठीं चलनवाढीचा अवलंब करावा लागेल. अशा प्रकारें २०० कोटी रुपयांची चलनवाढ देशाच्या अर्थव्यवस्थेला धक्का दिल्या-खेरीज आपल्याला करतां येईल अशी नियोजन-मंडळाची कल्पना आहे.

१९५० पूर्वींच हातीं घेतलेल्या कित्येक योजना गेल्या दोन वर्षांत पुऱ्या होण्याइतक्या प्रगत अवस्थेला आलेल्या होत्या.[२] त्यामुळें त्या योजनांवर साहजिकच अधिक खर्च करावा लागला. पुढील तीन वर्षांत हा ताण कमी होईल. सरकारनें उभें करावयाच्या १२५८ कोटी रुपये भांडवलापैकीं ६६७ कोटी रुपये आधींच कारणीं लागलेले आहेत. उरलेला भाग तीन वर्षांच्या कालखंडांत गोळा करणें सरकारला कठीण जाऊं नये. परंतु त्यासाठीं कसोशीनें प्रयत्न करणें मात्र आवश्यक आहे. त्याचीं कारणें अशीं : ( १ ) वरील सरकारी उत्पन्नाच्या अंदाजांत बाहेरून मिळालेल्या मदतीपैकीं सुमारें १२० कोटी रुपयांचा समावेश १९५१ ते १९५३ या कालखंडांत झालेला आहे. या मदतीसाठीं अर्थातच तात्कालिक बचतीचे श्रम राष्ट्राला त्या वेळीं करावे लागले नाहींत. परंतु अशी मदत उपलब्ध नसतांना उत्पन्नाचें तेंच मान कायम ठेवण्यासाठीं तसे श्रम करणें भाग पडेल. ( २ ) १९५२–१९५३ च्या अंदाजपत्रकांतहि परिस्थिति उत्साहजनक नाहीं. मध्यवर्ती अंदाज-पत्रकांत १९५१–५२ या वर्षी ९३ कोटींची शिल्लक होती ( प्राथमिक ताळेबंद ). १९५२–५३ च्या अंदाजपत्रकांत हा आंकडा केवळ ४ कोटींचा आहे. १९५२–१९५३ मधील एकूण सर्व राज्य-सरकारांचीं अंदाजपत्रकेंहि थोड्याशा तुटीचींच आहेत. ( ३ ) जनतेवरील कर वाढविण्याची मर्यादा संपत आलेली आहे. पाटबंधाऱ्याचा पाण्या-वरील विकासकर, शेतीच्या उत्पन्नावरील कर, वारसा-कर असे कांहीं नवीन कर लादतां येण्या-सारखे आहेत. परंतु त्यांच्यापासून व्हावयाच्या उत्पन्नालाहि मर्यादा आहेत. यांखेरीज, यापुढें कोणताहि नवीन कर लादतांना एकूण नियोजनावर त्याचे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष परिणाम कोणते होतील याचा नीट विचार करावा लागेल. ( ४ ) मोठमोठीं कर्जें उभारून पैसा उभा करतां येण्याची शक्यता कमी आहे. या मार्गानें फार पैसा उभा करतां येत नाहीं असें भारतांतील गेल्या कांहीं वर्षांचा अनुभव सांगतो. १९४७–१९४८ पासून पुढें तर नवीन कर्जांनीं मिळणाऱ्या पैशापेक्षां जुन्या कर्जांच्या परत-फेडीसाठीं द्यावा लागणारा पैसा हाच अधिक होऊं लागला आहे. मोठीं कर्जें भांडवलदार, बँका वगैरे अशीं सधन कुळेंच देऊं शकतात. त्यांच्याकडून पैसा घेणें म्हणजे पर्यायानें खाजगी भांडवलाच्या उभारणीसाठीं कमी पैसा शिल्लक ठेवण्यासारखें होय.

---

२. खालील आंकड्यांवरून सरकारचें उत्पन्न ( मध्यवर्ती सरकार व सर्व राज्यसरकारें यांचें मिळून ) व विकास–योजनांसाठीं आजवर झालेला एकूण सरकारी खर्च यांची कल्पना येऊं शकेल. या मार्गानें भांडवल उभें करण्याची आपली कुवत किती आहे याचाहि अंदाज या आंकड्यांवरून येऊं शकेल :

| | १९५०–५१ ( अखेरचा ताळेबंद ) | १९५१–५२ ( प्रा. ताळेबंद ) | १९५२–५३ ( अंदाजपत्रकांतून ) |
|---|---|---|---|
| | ( आंकडे कोटी रुपयांचे ) | | |
| सरकारी उत्पन्न ( यांत कर, कर्जे व इतर सर्व बाबींपासूनच्या उत्पन्नाला समावेश आहे ) | ९२१ | १०६८ | ९३३ |
| विकासयोजनांसाठीं एकूण सरकारी खर्च | २५२ | ३१७ | ३५० |

नियोजनांत खाजगी भांडवलाचें कार्यक्षेत्र मान्य केल्यानंतर खाजगी भांडवलाचा पुरवठा कमी होणार नाहीं, असेंच धोरण आंखावयास पाहिजे. या दृष्टीनें लहानसहान ठेवीदारांकडून 'थेंबें थेंबें तळें सांचे' या न्यायानें एकत्रित होणाऱ्या भांडवलाची आपल्याला फार आवश्यकता आहे.

नियोजनकालांत हे १२५८ कोटी रुपये कोणत्या मार्गांनीं मिळूं शकतील याविषयींची सरकारची अपेक्षा खालील आंकड्यांवरून कळून येईल :

| | ( कोटी रुपये ) |
|---|---|
| राज्यसरकारांची अंदाजपत्रकी शिल्लक | ४०८ |
| मध्यवर्ती सरकारची अंदाजपत्रकी शिल्लक | १६० |
| रेल्वेपासून नफा | १७० |
| जनतेपासून कर्ज | ११५ |
| जनतेपासून लहान ठेवी | २७० |
| इतर ठेवी वगैरे | १३५ |
| एकूण | १२५८ |

भांडवलाच्या उभारणीवर विकासाची गति अवलंबून असते. भारतांत भांडवल व राष्ट्रीय उत्पन्नाची वाढ याचें प्रमाण ३ : १ असें पडेल, असें नियोजनमंडळाचें अनुमान आहे. इतर राष्ट्रांतील अनुभवांशीं जुळतें असेंच हें अनुमान आहे. पंचवीस वर्षांच्या कालावधींत दर डोई उत्पन्न दुप्पट करून दाखवावयाचें असेल तर दर वर्षी राष्ट्रीय उत्पन्नापैकीं १२ ते १५ टक्के उत्पन्न बचत करून भांडवलरूपानें गुंतविणें आवश्यक असतें. लोकसंख्या वाढत असली तर हें प्रमाण २० टक्क्यांपर्यंतहि वर चढवावें लागतें. अ-प्रगत राष्ट्रांचें राहणीचें मान खालचें असतें, बचत करण्याची त्यांची शक्तीहि त्यामुळें कमी असते. आज राहणीचें मान कमी ठेवून उद्यांच्या समृद्धीसाठीं भांडवलाची बचत करावी कीं भावी विकास सावकाश झाला तरी हरकत नाहीं, परंतु आजची होणारी उपासमार टाळावी, हा अप्रगत राष्ट्रांपुढें उभा असणारा बिकट प्रश्न असतो. बाहेरून भरपूर भांडवली मदत मिळण्यासारखी असली तरच हा प्रश्न सुकरपणें सोडवितां येण्यासारखा असतो. नाहीं तर उद्यांवर नजर ठेवून आज पोट आवळून काम करणें एवढेंच शिल्लक उरतें.

नियोजनाच्या प्रगतीबरोबर राष्ट्रीय उत्पन्नांत उत्तरोत्तर वाढ होत गेली कीं, हा प्रश्न सुटणें अधिकाधिक सोपें होतें. कारण, अधिक निर्माण झालेल्या उत्पन्नापैकीं विशेष भाग बचत करणें तितकेंसें जड वाटत नाहीं. या योजनेच्या कालांत उत्पन्नांत झालेल्या नवीन वाढीपैकीं २० टक्के भाग भांडवली बचत म्हणून उपयोगांत आणावा, अशी नियोजनमंडळाची सूचना आहे. १९५०–५१ मध्यें आपलें राष्ट्रीय उत्पन्न ९००० कोटी रुपयांचें होतें. १९५५–५६ या वर्षी तें १०००० कोटी रुपयांचें होईल. त्यानंतर मात्र प्रतिवर्षी उत्पन्नांत होणाऱ्या नवीन वाढीपैकीं पन्नास टक्के भाग भांडवल म्हणून उपयोगांत आणावा, असें मंडळानें सांगितलें आहे. या पद्धतीनें विकास होत गेल्यासच १९७७ पर्यंत आपलें दर डोई उत्पन्न दुप्पट करतां येईल. १९७७ मध्यें आपलें राष्ट्रीय उत्पन्न २५००० कोटी रुपयांचें असेल व त्यांपैकीं ५००० कोटींची भांडवली बचत करण्यांत येईल. या वेगानें १९६७ सालापासून पुढें प्रतिवर्षी आपल्या राष्ट्रीय उत्पन्नापैकीं जवळजवळ २० टक्क्यांची आपण भांडवली बचत केलेली असेल. यासाठीं पराकोटीचे श्रम व निग्रह या दोहोंचीहि अत्यंत जरूरी आहे. राष्ट्राच्या भावी उन्नतीसाठीं असा त्याग करावयाची संधि मिळणें हाच या पिढीचा भाग्यलेख आहे.

गेल्या दोन वर्षांत भारताला मिळालेली परकीय मदत १५६ कोटी रुपयांची होती. यांपैकीं अमेरिकेच्या सरकारकडून सुमारें १२० कोटी रुपयांची मदत मिळाली आहे. 'कोलंबो-योजने'-प्रमाणें कॅनडा, ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड या राष्ट्रांकडून सुमारें १२ कोटी रुपयांची मदत मिळाली आहे. त्याचप्रमाणें फोर्ड फौउन्डेशननें दीड कोट रुपये दिले आहेत व आन्तरराष्ट्रीय बँकेनें दिलेल्या कर्जापैकीं ९ कोटी रुपये हातीं आले आहेत.

यावरून एक गोष्ट स्पष्ट होईल कीं, ही आलेली सर्व मदत त्या त्या राष्ट्रांच्या सरकारांकडून मिळालेली आहे किंवा विकासयोजनांना मदत करण्यासाठीं मुद्दाम स्थापन करण्यांत आलेल्या आन्तरराष्ट्रीय बँकेसारख्या जागतिक संस्थे-










करून आलेली आहे. नवीन परकीय खाजगी भांडवलाचा प्रवाह या काळांत भारतांत जवळजवळ आलाच नाहीं, असें म्हटलें असतांहि चालेल. १९४९ नंतर अमेरिकन खाजगी भांडवलाची भारतांतील गुंतवण एक-दोन कोटी रुपयांच्याहि वर गेलेली नाहीं. यापुढें कांहीं काळपर्यंत तरी भारतांत परकीय भांडवलाचा प्रवाह हा दोन्ही राष्ट्रांच्या सरकारमार्फतच चालू राहील ही गोष्ट उघड आहे. आपल्या सरकारच्या परराष्ट्रीय व अन्तर्गत राजकीय धोरणाला महत्त्व येतें तें यामुळेंच. आन्तरराष्ट्रीय राजकारणांत व अर्थकारणांत भारताला शोभिस्कर स्थान मिळवून देणें हें भारताच्या राजकीय नेत्यांचें काम आहे. अमेरिकन खाजगी भांडवलदार आज आशिया खंडांत भांडवल गुंतवावयास उत्सुक नाहींत. त्यांचीं केवळ कारणें या ठिकाणीं नमूद केलीं कीं पुरेसें आहे. तीं अशीं : (१) खुद्द अमेरिकेंत भांडवलाच्या गुंतवणीपासून त्यांना पुरेसा मिळणारा नफा. (२) अनिश्चित जागतिक परिस्थिति. (३) आशियांतील राष्ट्रांतून दिसणारी अन्तर्गत राजकारणांतील अनिश्चितता. (४) संभाव्य राष्ट्रीयीकरणाची भीति. (५) जाचक कर लादले जाण्याची शंका. (६) मिळालेला नफा डॉलरच्या रूपानें परत अमेरिकेंत आणतां येईल कीं नाहीं याविषयीं संदेह.—या परिस्थितींत नजिकच्या भविष्यकालांत तरी निश्चित असा अनुकूल फरक पडेल अशीं चिन्हें दिसत नाहींत. इतर राष्ट्रांचीं सरकारें व आन्तरराष्ट्रीय बँक यांच्याकडूनच मिळणाऱ्या मदतीवर आपल्याला विसंबून राहिलें पाहिजे.

परकीय मदत अपेक्षेपेक्षां अपुरी पडली तर चलनवाढीचा अवलंब करणेंहि भाग पडेल. अलीकडे कांहीं वर्षें चलनवाढीविरुद्ध आपण तात्त्विक तरी कटाक्ष धरला आहे. व्यवहारांतहि चलनवाढीचे दुष्परिणाम दिसूं नयेत याविषयीं आपण जपत आलों आहोंत. चलनवाढीमुळें भाववाढ होते व वेगवेगळ्या वर्गांवर त्या भाववाढीचा विषम ताण बसतो, हा चलनवाढीविरुद्धचा नेहमींचा आक्षेप आहे. नियोजनाच्या काळांत भाववाढ होऊं दिली, तर आज रुपयांच्या हिशोबांत केलेले योजनेंतील सर्वच अंदाज चुकतील, हाहि एक धोका आहेच. चलनवाढ करूनहि त्यापासून होणारे अपाय टाळण्यासाठीं सरकारला कांहीं गोष्टी करतां येणें शक्य असतें. करवाढ करून बाहेर गेलेलें चलन पुन्हां परत आणण्याचा प्रयत्न, भाववाढीवर नियंत्रण व जीवनाला आवश्यक असणाऱ्या वस्तूंचें शिधापद्धतीनें वांटप या गोष्टी करून चलनवाढीचे दुष्परिणाम सामान्य जनतेला सुसह्य असे करतां येतात. परंतु यासाठीं सामर्थ्यवान् व कार्यक्षम अशा राज्यसंस्थेची आवश्यकता असते. आज तरी आपल्याजवळ तसें राज्ययंत्र नाहीं. चलनवाढीच्या प्रमाणांत बाजारांत विनिमयासाठीं येणाऱ्या वस्तूंचें प्रमाणहि जर वाढलें तरीहि भाववाढ रोखली जाते. यामुळें आवश्यक वस्तूंचें उत्पादन या काळांत आपण कितपत वाढवूं शकतों यावर चलनवाढीचे परिणाम बरेचसे अवलंबून राहतील. ज्या प्रमाणांत चलनवाढ होईल त्या प्रमाणांत स्टर्लिंग गंगाजळीचा उपयोग करून मालाची आयात करावी, बाजारपेठेंतील विनिमयाच्या वस्तूंचें प्रमाण वाढवावें व व चलनवाढीमुळें भाववाढ होऊं देऊं नये, अशी कल्पना नियोजनमंडळानें मनाशीं बांधली आहे. स्टर्लिंग गंगाजळीच्या तारणावरच आपली चलनवाढ झालेली आहे. आज त्या गंगाजळीचा असें तारण म्हणूनच उपयोग केला जात आहे. हें तारण काढून घेतल्यास होणाऱ्या परिणामांचा नियोजनमंडळानें अधिक सूक्ष्म व स्पष्टपणें विचार करावयास हवा होता असें वाटतें.

अखेर मुख्य प्रश्न उत्पादनाचाच आहे. निसर्गसंपत्ति व श्रमशक्ति यांवरच उत्पादन-योजनांची मुख्य मदार. भांडवल हें त्यांचें प्रमुख सहायक; आणि प्रत्यक्ष उत्पादनावर होणारे परिणाम हाच कोणत्याहि नियोजनाच्या यशस्वितेचा मुख्य निकष.

### शेतीला महत्त्वाचें स्थान

शेतीचें भारताला आत्यन्तिक महत्त्व आहे हें सांगावयाची आवश्यकता नाहीं. भारताचें आर्थिक व राजकीय स्वास्थ्य शेतीच्या सुस्थितीवरच अवलंबून राहणार आहे. आपल्या नियोजनाला पायाभूत म्हणून नियोजनमंडळानें पहिल्या पंचवार्षिक योजनेमध्यें शेती व पाटबंधारे यांना आद्य महत्त्वाचें स्थान दिलें आहे हें युक्तच आहे. याखेरीज इतर

दृष्टीनेंहि शेतींतील उत्पादनवाढीकडे लक्ष देणें अगत्याचें झालें होतें. १९४८ नंतर अन्नधान्याची आयात आपल्याला दरवर्षी करावी लागलेली आहे. आजवर या आयातीसाठीं आपले ७५० कोटी रुपये खर्चीं पडले आहेत. स्टर्लिंग गंगाजळीच्या आधारावर आजवर हा खर्च करतां तरी आला. हा प्रतिवार्षिक खर्च अनिश्चित कालपर्यंत यापुढें चालू ठेवणें आपल्याला शक्य होणार नाहीं. शेतकी-प्रधान राष्ट्रानें अन्नधान्याच्या बाबतींत स्वयंपूर्ण असणें हेंच युक्त आहे. ( मलायाप्रमाणें एखाद्या कच्च्या मालाच्या निर्यातीवरच सर्व अर्थव्यवस्था अवलंबून असल्यास गोष्ट वेगळी. परंतु भारताची तशी परिस्थिति नाहीं. भरपूर प्रमाणांत निर्यात करण्यासाठीं आपल्याकडे पक्का माल नाहीं, तितका कोणताहि एक कच्चा मालहि नाहीं. ) पाकिस्ताननिर्मितीनंतर व्यापारी महत्त्वाच्या पिकांच्या बाबतींतहि अडचणी उभ्या राहिल्या. ही परिस्थिति विशेषतः कापूस व ज्यूट या पिकांच्या बाबतींत जाणवली. कापडाच्या व तागाच्या गिरण्या भारताच्या प्रदेशांत होत्या. परंतु अखंड भारतांतील तागाच्या उत्पादनापैकीं ८० टक्के उत्पादन व कापसाच्या उत्पादनापैकीं ४० टक्के उत्पादन पाकिस्तानी प्रदेशांत होत असे. या कच्च्या मालाचें उत्पादन शक्य तर व शक्य तितकें भारतांत होणें हेंच इष्ट आहे. या दृष्टीनेंहि शेतीच्या उत्पादनवाढीची योजना आवश्यक होती.

पंचवार्षिक योजनेच्या कालांत शेतीच्या उत्पादनांत पुढीलप्रमाणें वाढ होईल अशी अपेक्षा आहे :

| | आंकडे लक्षांचे | शेंकडा वाढ |
|---|---|---|
| अन्नधान्य | ७६ ( टन ) | १४ |
| कापूस | १२·६ ( गासड्या ) | ४२ |
| ताग | २०·९ ( गासड्या ) | ६३ |
| ऊंस | ७ ( टन ) | १२ |
| गळिताचीं धान्यें | ४ ( टन ) | ८ |

अन्नधान्याच्या उत्पादनांतील वाढ ही मुख्यत्वें-करून ( ६५ लक्ष टन ) राज्यसरकारांच्या प्रयत्नांनीं व्हावयाची आहे. ही वाढ खालील उपाययोजनांनीं साध्य करण्यांत येईल :

( आंकडे लक्ष टनांचे )

| | |
|---|---|
| मोटीं धरणाचीं कामें | २० |
| लहान पाटबंधारे | १८ |
| पडीक जमीन लागवडीखालीं आणून | १५ |
| खतांचा वापर | ६ |
| चांगलें बी-बियाणें | ६ |
| | ६५ |

योजनेच्या पहिल्या आराखड्याप्रमाणें हातीं घेतलेल्या धरण-पाटबंधाऱ्यांच्या कामासाठीं एकूण ७६५ कोटी रुपयांचा खर्च लागेल. त्या योजना पूर्ण झाल्यानंतर त्यांच्या पाण्याखालीं १६९ लक्ष एकर जमीन भिजेल व १५ लक्ष किलोवॅट वीज निर्माण होईल. या एकूण खर्चापैकीं ५१८ कोटी रुपयांचा खर्च १९५६ मध्यें झालेला असेल. व ८५ लक्ष एकर जमिनीला पाणीपुरवठ्याची सोय, ११ लक्ष किलोवॅट वीजनिर्मिति इतक्या गोष्टी साध्य झालेल्या असतील. याखेरीज नवीन योजनापत्रकाप्रमाणें, कोसी योजनेचा प्रथमविभाग ( बिहार व नेपाळ : ६६ कोटी रुपये ), कोयना-योजनेचा प्रथमविभाग ( ३३ कोटी रुपये : २४००० किलोवॅट वीजनिर्मिति ), कृष्णा-योजना ( मद्रास व हैद्राबाद, इतर माहिती दिलेली नाहीं ), चंबळ-योजनेचा प्रथमविभाग ( मध्य प्रदेश व राजस्थान : ३४ कोटी रुपये ) व रिहंद-योजना ( उत्तर प्रदेश, ३५ कोटी रुपये )—अशा नवीन नदीयोजना या पंचवार्षिक योजनेच्या कालांत सुरू व्हावयाच्या आहेत. या योजनांवर व्हावयाच्या एकूण सुमारें २०० कोटी रुपयांच्या खर्चापैकीं ४० कोटी रुपयांचा खर्च १९५६ पूर्वी झालेला असेल.

धरण-पाटबंधाऱ्यांच्या योजनांचा अनुक्रम ठरवितांना खालील गोष्टींकडे लक्ष देणें आवश्यक होतें : ( १ ) राज्यसरकारांनीं आधींच हातीं घेतलेल्या योजना पूर्ण करणें. ( २ ) पाण्याच्या इतर उपयोगापेक्षां अन्नधान्याच्या उत्पादनासाठीं उपयोगी पडणाऱ्या योजना प्रथम हातीं घेणें. ( ३ ) वीजनिर्मितीसाठीं प्रयत्न करतांना त्या विजेसाठीं पुरेशी मागणी राहूं शकेल कीं नाहीं, तिचा फायदा कोणत्या प्रदेशाला मिळेल, औद्योगीकरणावर तिचा काय परिणाम होईल, याचा विचार करणें.

(४) पावसाच्या अनिश्चिततेमुळें दुष्काळाची भीति असलेल्या प्रदेशाकडे विशेष लक्ष पुरविणें. (५) भारतांतील निर्धन प्रदेशांच्या उन्नतीच्या दृष्टीनें योजनांचा कालानुक्रम ठरविणें. (६) तज्ज्ञ व तंत्रज्ञ यांचा तुटवडा लक्षांत घेऊन, आहेत त्यांचा पुरेपूर उपयोग करून घेतां येईल अशा रीतीनें कामाची आंखणी करणें. —अशा योजनेची नीट आंखणी करावयासच दोन-तीन वर्षें सहज लागतात. नंतर काम पुरें व्हावयास दहा-बारा वर्षांचा अवधि लागतो. आज हातीं घेतलेल्या योजना पूर्ण झाल्यानंतरहि सुमारें २००० कोटी रुपयांचें काम या क्षेत्रांत करावयाचें बाकी असेल. यामुळें, दीर्घसूत्रीपणानें नव्हे परंतु दूरदृष्टीनेंच, या कामाची आंखणी करणें आवश्यक होऊन बसतें. वरील सर्व अडचणी व आतांच्या योजनेंत नवीन हातीं घेतलेलीं कामें लक्षांत घेतां नियोजन-मंडळाच्या निर्णयावर विशेष आक्षेप घ्यावयास जागा नाहीं.

पाणीपुरवठा, खत-बी-बियाण्यांची सोय, शेतीला मदत करणाऱ्या व उत्पादनावर देखरेख ठेवणाऱ्या सरकारी यंत्रणेची कार्यक्षमता——या गोष्टीं-वर शेतीच्या उत्पादनवाढीची यशस्विता अवलंबून आहेच. परंतु याखेरीजहि अधिक मूलगामी असे दुसरे फेरफारहि आवश्यक आहेत. ते असे : (१) जमिनीचें फेरवांटप. (२) सहकारी उत्पादन (३) सहकारी खरेदी-विक्री. (४) उत्पादनासाठीं आर्थिक साहाय्य. (५) उत्पादनयोजनेला पोषक होईल असें निरनिराळ्या मालांच्या किंमतींतील तारतम्य.

जमिनींत कोणाकोणाचे कसकसे हक्क गुंतलेले आहेत याविषयींची नीट संकलित माहितीहि आज उपलब्ध नाहीं. याविषयींची सार्वत्रिक नोंदणी (census) राज्यसरकारांनीं १९५३ मध्यें करावी असा नियोजनमंडळानें आदेश दिला आहे. शक्य तोंवर जमिनींतील सर्व महत्त्वाचे हक्क वहिवाट करणाऱ्यांच्या हातीं असावे, असाच यापुढील प्रयत्न राहील. जमीनदारी नष्ट करण्यासंबंधींच्या प्रयत्नांत आजवर निरनिराळ्या प्रांतांत प्रगति झालेलीच आहे. याखेरीज प्रत्येक राज्यसरकारानें आपली विशिष्ट परिस्थिति लक्षांत घेऊन, एका कुटुंबाला उपलब्ध साधनांनीं कसतां येण्याजोगा जमिनीचा क्षेत्र-आकार (यालाच आपण 'कौटुंबिक क्षेत्र' असें म्हणूं) ठरवावयाचा आहे. याहून फार तर तिप्पट आकाराचें क्षेत्र मालकाला खाजगी मशागतीसाठीं राखतां येईल. त्यावरील सर्व क्षेत्र कुळाच्या मालकी-हक्काचें व्हावें असे प्रयत्न व्हावेत, असें नियोजनमंडळानें सुचविलें आहे. जमिनीची योग्य किंमत मात्र मालकाला मिळावी. (साम्यवादी विचारसरणीच्या लोकांचा या सूचनेला विरोध राहणार ही गोष्ट उघड आहे.) ही किंमत कर्जरोख्यांच्या रूपानें देण्यांत यावी व कुळाकडून जमिनीच्या साऱ्याबरोबरच सरकारनें या किंमतीचे हप्तेहि वसूल करून घ्यावेत. —या सूचनांची अंमलबजावणी (योग्य किंमत, माफक हप्ते, नियमित परतफेड वगैरे) एकूण राजकीय वातावरणावरच केव्हांहि अवलंबून राहील.

कौटुंबिक क्षेत्राहून कमी क्षेत्र असणारे लहान शेतकरी व एका कौटुंबिक क्षेत्राहून अधिक परंतु तीन कौटुंबिक क्षेत्रांहून कमी असणारे मध्यम शेतकरी यांनीं सहकारी पद्धतीनें जमीन कसण्यासाठीं प्रयत्न करणें आवश्यक आहे. पडीक जमीन लागवडीखालीं आणतांनाहि खेडेगांवांतील सहकारी प्रयत्नांना उत्तेजन दिलें जावें; सहकारी खरेदी-विक्रीचेहि सार्वत्रिक प्रयत्न झाले पाहिजेत, तरच बाजारांत येणारी पूर्ण किंमत शेतकऱ्याच्या पदरांत पडूं शकेल, नाहीं तर आज मधला अडत्याच बराचसा भाग गिळंकृत करून बसतो, ——इत्यादि गोष्टींचें प्रतिपादन करून नियोजनमंडळानें सहकार्या-वर भर दिला आहे तो युक्तच आहे.

शेतकऱ्याला उत्पादनकार्याच्या मदतीसाठीं साहाय्याची आवश्यकता ही राहतेच. हंगामापुरतें कांहीं कर्ज त्याला लागत असतें. विहिरी, बांध-बंदिस्ती, ताली अशांसाठीं कांहीं अधिक मदतीचें कर्जहि त्याला आवश्यक असतें. अशा रीतीनें दर वर्षीं १०० कोटी रुपयांचें हंगामी कर्ज, २५ कोटी रुपयांचें कांहीं अधिक मुदतीचें कर्ज व ५ कोटी रुपयांचें प्रदीर्घ मुदतीचें कर्ज शेतकऱ्यास मिळावें अशी अपेक्षा आहे. मध्यवर्ती सरकार, राज्य-सरकारें, रिझर्व्ह बँक व सहकारी संस्था यांच्या-



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मार्फत हा निधि गोळा होईल अशी नियोजन-मंडळाची कल्पना आहे.

सर्वांगीण सहकारितेच्या यशस्वितेवरच आपल्या शेतीचा अभ्युदय अवलंबून आहे. सहकारी कर्ज-संस्था व सहकारी खरेदीविक्रीचे संघ यांविषयींचे प्रयोग भारत गेलीं सुमारें पन्नास वर्षें करीत आहे. अजूनहि सहकारी चळवळीनें म्हणावें तसें मूळ धरलेलें नाहीं. सरकारी रेट्यामुळें संस्थांच्या व सभासदांच्या संख्येंत वाढ होते, परंतु बहुतेक सर्व संस्थांची शक्ति मात्र कमकुवतच राहते, असाच आजवरचा अनुभव आहे. भरमाप पैसा ओतला कीं कांहीं ना कांहीं थोडेसें फळ दिसतेंच. परंतु तें कांहीं यशस्वितेचें खरें गमक नव्हे. सहकारी चळवळींत नवा प्राण ओतण्याची आज आवश्यकता आहे. या बाबतींत नियोजनमंडळानें कांहीं नवीन सूचना केलेल्या नाहींत. पूर्वींच्या कांहीं समित्यांनींहि हा विचार केलेला आहे. या क्षेत्रांत आतां सुचवावयाचें असें फारच थोडें उरलें असेल. सूचना कृतींत उतरविणें हेंच तेवढें आतां उरलें आहे. भारतांतील व्यक्तिमात्राच्या विधायक कर्तृत्वशक्तीला तें आवाहनच आहे.

सहकारी शेतीचे तर हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेहि यशस्वी प्रयोग आपल्याकडे झालेले नाहींत. ते झालेच पाहिजेत एवढेंच आपल्याला आग्रहानें म्हणतां येईल. कारण दुसरा मार्गच नाहीं. एष पन्था । एतत्कर्म । नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ।

हुकूमशाहींत कडक नियंत्रण ठेवूनहि शेतकऱ्याला योजनेप्रमाणें आवश्यक त्या मालाचें उत्पादन करावयास भाग पाडण्याचा प्रयत्न करतां येतो. परंतु हुकूमशाहीहि या क्षेत्रांत आपल्या मार्गानें पूर्णपणें यशस्वी होऊं शकत नाहीं. रशियामध्ये असाच अनुभव आला. त्याशिवाय, भारतांत आपल्याला हुकूमशाही मार्गाचा अवलंब करावयाचा नाहीं हें दुसरें एक कारण आहेच. त्यामुळें शेतकऱ्याला उत्पादनवाढीविषयीं उत्साह वाटावा व त्यानें योग्य त्या मालाचेंच उत्पादन करावें असें वाटत असल्यास, मालाच्या किंमती ठरवितांना योग्य काळजी घ्यावी लागते. या बाबतींत सांभाळावयाचीं मुख्य धोरणें अशीं : ( १ ) शेतकी माल व कारखानदारी माल यांच्या परस्परविनिमयांत शेतकी मालाच्या किंमती कारखानदारी मालाच्या किंमतीच्या मानानें खालीं पडूं देतां कामा नयेत; नाहीं तर –( उदा० शेतकी मालाच्या किंमतींत २५ टक्क्यांची वाढ झाली व कारखानदारी मालाच्या किंमतींत ७५ टक्के वाढ झाली– ) पूर्वींइतकाच कारखानदारी माल खरेदी करण्यासाठीं शेतकऱ्याला आपल्याजवळील शेतकी माल पूर्वींहून अधिक विकावा लागतो. यामुळें शेतकऱ्याचें जीवनमान घटतें. या दोन मालांच्या किंमतींतील तारतम्य सांभाळणें यामुळें आवश्यक होऊन बसतें. ( २ ) शेतीच्याच निरनिराळ्या मालाच्या किंमतींतील तारतम्य सांभाळलें पाहिजे. व्यापारी पिकांच्या व अन्नधान्याच्या पिकांच्या किंमतींतील तरतमभावाप्रमाणें शेतकरी आपल्या शेतांत कोणतें पीक काढावयाचें तें ठरवील. योजनेप्रमाणें कमी किंमतीचें पीकच त्या प्रदेशांत काढणें आवश्यक असलें तरीहि शेतकरी आपल्या मार्गानीं अशी योजना डावलण्याचा प्रयत्न करील. ( ३ ) असें धोरण ठरवितांना देशांतील सामान्य परिस्थिति व प्रादेशिक विशिष्ट परिस्थिति यांचा कसोशीनें विचार करावा लागतो. तपशिलाचा नीट अभ्यास केल्याखेरीज असे निर्णय घेणें शक्य नसतें.

असा सर्वंगामी विचार करणारी यंत्रणा नियोजन-मंडळानें अस्तित्वांत आणणें आवश्यक होतें. तशी स्पष्ट तरतूद योजनेंत केलेली आढळत नाहीं.

### औद्योगिक विकास

नियोजन म्हटलें कीं झपाट्यानें होत जाणाऱ्या औद्योगीकरणाची कल्पना डोळ्यांसमोर खेळूं लागते. उत्पादनाची वाढ व्हावी व वर्गावर्गांतील आर्थिक विषमता कमी व्हावी या दृष्टीनेंहि उद्योग-धंद्यांविषयींचें सरकारचें धोरण महत्त्वाचें असतें. या दोन ध्येयांचा समन्वय कसा घालावा हाहि एक बिकट प्रश्न असतो. उद्योगधंद्यांचा विकास खाजगी भांडवलदारांच्या हातीं ठेवला कीं हा विरोध अधिक तीव्रपणें जाणवूं लागतो. आपल्या सरकारचें अंतिम ध्येयहि समाजवादी राष्ट्रीयीकरणाचें नाहीं. तें तसें असतें तरी आजच्या व्यावहारिक










परिस्थितींत त्याला बरीच मुरड घालावी लागली असती.

भारत-सरकारचें औद्योगिक धोरण १९४८ सालीं जाहीर करण्यांत आलें. त्या धोरणाचाच विकास आतां पुढें होत आलेला आहे. आचरणाच्या दृष्टीनें 'औद्योगिक-विकास-नियंत्रण-कायदा' (१९५१) हा या धोरणाचा सर्वांत अलीकडचा टप्पा होय. या कायद्याच्या कक्षेंत येणाऱ्या ३७ उद्योगधंद्यांच्या व्यवस्थेंत सरकारला जरूर तर हस्तक्षेप करतां येईल. या कायद्यामुळें अर्थातच कोणालाच संतोष नाहीं. भांडवलदार, समाजवादी, साम्यवादी यांना वेगवेगळ्या कारणांनीं तो अनिष्ट किंवा अपुरा वाटतो. त्याचें प्रत्यक्ष फलित अर्थातच त्याची अंमलबजावणी कशी होते यावर अवलंबून राहील.

भारत-सरकारच्या औद्योगिक धोरणाची स्थूल रूपरेषा पुढीलप्रमाणें सांगतां येईल : (१) परकीय खाजगी भांडवलाचें स्वागत करावयाची सरकारची तयारी आहे. परकीय भांडवलदारांविरुद्ध जाचक असे कायदे मुद्दाम केले जाणार नाहींत, राष्ट्रीयीकरण केल्यास योग्य ती नुकसानभरपाई मिळेल, रुपयांच्या स्वरूपांत भारतांत मिळविलेला नफा परत स्वराष्ट्रीं नेण्यासाठीं आवश्यक तें चलन उपलब्ध करून दिलें जाईल अशीं आश्वासनें योजनेंत दिलेलीं आहेत. परकीय भांडवल देशी भांडवलाला व औद्योगिक विकासाला विरोधक होऊं नये अशी मात्र अपेक्षा राहील. हीं सर्व आश्वासनें परकीय, विशेषतः अमेरिकेंतील, भांडवलदारांना कितपत स्पृहणीय व विश्वसनीय वाटतात यावरच बरेंचसें अवलंबून राहील. परकीय खाजगी भांडवलदारांना वाटणाऱ्या इतर अडचणींचा उल्लेख पूर्वी येऊन गेलेलाच आहे. (२) भारतांत आज असलेले खाजगी मालकीचे उद्योगधंदे राष्ट्राच्या मालकीचे करण्याची निकड नाहीं, असें नियोजनमंडळाचें मत आहे. राष्ट्रीयीकरण केल्याखेरीजहि इष्ट तें नियंत्रण या उद्योगधंद्यांवर ठेवतां येईल असा नियोजनमंडळाला विश्वास वाटतो. (३) कांहीं उद्योगधंदे संपूर्णपणें सरकारच्याच मालकीचे राहतील. युद्धसाहित्याची निर्मिति, अणुशक्ति व रेल्वेवाहतूक हीं या सदराखालीं येतात. कोळसा, लोखंड, पोलाद, विमान व जहाजें यांचे कारखाने, टेलिफोन, तारायंत्र, रेडिओ यांसारखीं दळवळणाचीं साधनें—यांच्या उत्पादनांत शक्य त्या प्रमाणांत खाजगी भांडवलालाहि सहकारी करून घेण्यांत येईल. उरलेलें सर्व औद्योगिक क्षेत्र खाजगी भांडवलदार, सहकारी उद्योगसंस्था यांच्यासाठीं मोकळें ठेवण्यांत येईल. सहकारी उद्योगसंस्था अस्तित्वांत नसल्यामुळें आज तरी याचा अर्थ, हें क्षेत्र खाजगी भांडवलदारांच्या हातांत राहील, असाच होतो. या क्षेत्रांतहि सरकारचें मार्गदर्शन व नियंत्रण राहावें अशी नियोजनमंडळाची सदिच्छा आहे. (४) खाजगी प्रयत्नांना योग्य अशी भूमि मिळावी म्हणून कच्च्या मालाचें उत्पादन, वाहतूक व दळणवळणाचीं साधनें, आद्य महत्त्वाचे उद्योगधंदे (basic industries), संशोधन यांविषयीं सरकार दक्ष राहील. आंतरराष्ट्रीय व्यापाराचें धोरणहि अशा पद्धतीनें आंखण्यांत येईल कीं, यंत्रसामग्री व उत्पादनासाठीं आवश्यक तो माल मिळावा, परंतु परदेशी तयार मालाची अनिष्ट चढाओढ मात्र जाणवूं नये. कांहीं थोडा विभाग सोडून आपला इतर सर्व औद्योगिक विकास खाजगी भांडवलदारांच्याकरवीं व्हावा, अशी आज तरी योजनेची अपेक्षा आहे.

या पंचवार्षिक योजनेच्या कालांत औद्योगिक विकासासाठीं सरकारतर्फे एकूण १७३ कोटी रुपये खर्च व्हावयाचे आहेत. त्यांपैकीं ९४ कोटी मध्यवर्ती व घटक राज्यांच्या सरकारांनीं सुरू केलेल्या वेगवेगळ्या उद्योगधंद्यांसाठीं आहेत. अधिक खर्चापैकीं पन्नास कोटींचा खर्च आद्य महत्त्वाच्या उद्योगधंद्यांच्या विकासासाठीं व्हावयाचा आहे. खाजगी भांडवलाच्या क्षेत्रांत पुढीलप्रमाणें भांडवल उपयोगांत आणलें जावें अशी अपेक्षा आहे :

| | (कोटी रुपये) |
|---|---|
| जुनी झीज व घसारा भरून काढण्यासाठीं | १५० |
| नवीन उद्योगधंदे सुरू करण्यासाठीं | २३३ |
| कच्चा माल, मजूरी वगैरेसाठीं खेळतें भांडवल | २३० |
| एकूण | ६१३ |








नवीन उद्योगधंद्यांत गुंतवावयाच्या भांडवला-पर्की ८० टक्के भांडवल उत्पादनाचीं साधनें निर्माण करणाऱ्या कारखान्यांत गुंतविलें जावयाचें आहे. ( लोखंड व पोलाद ४३ कोटी रुपये, पेट्रोलशुद्धीकरण ६४ कोटी रुपये व सिमेंट १३ कोटी रुपये ). दैनंदिन व्यावहारिक गरजांच्या वस्तूंची निर्मिति वाढवावयाची नाहीं. आज आहेत त्याच उत्पादन-शक्तींचा पुरेपूर उपयोग करून घेऊन शक्य तितकें अधिक उत्पन्न काढावयाचें एवढाच त्यांच्या बाबतींत प्रयत्न राहील. केवळ कांहीं वस्तूंचाच याला अपवाद करण्यांत आला आहे ( उदा. कागद, औषधें इत्यादि ).

खाजगी क्षेत्रांत लागणारें भांडवल खाजगी प्रयत्नांनींच उभें झालें पाहिजे. याचा अर्थ खाजगी भांडवलदार व बँका यांच्याकडून या भांडवलाची तरतूद झाली पाहिजे. योजनेच्या आराखड्यांत या भांडवल-उभारणीविषयीं खालीलप्रमाणें कल्पना होती : ( कोटी रुपये )

| | |
|---|---|
| जादा नफ्यांतील ठेवी ( E. P. T. deposits ) | ६० |
| शेअर-भांडवल उभारून | ९० |
| इंडस्ट्रिअल फिनॅन्स कॉर्पोरेशनकडून | २५ |

आजच्या योजनेंत ही अपेक्षा वाढली आहे. योजनेच्या अपेक्षेप्रमाणें राष्ट्रीय उत्पन्न वाढत गेलें व अपेक्षेप्रमाणें भांडवली बचत होत गेली तर शेअर-मार्केट व बँका यांच्यामार्फत नवीन अपेक्षा पुरी होऊं शकेल असें नियोजनमंडळाला वाटतें. १९५०–५१ या वर्षी नफ्याची बचत करून ३४ कोटी रुपये भांडवलरूपानें गुंतविण्यांत आले. याच प्रमाणांत पुढेंहि बचत सुरू राहिल्यास याच मार्गानें १७० कोटी रुपये उभे राहूं शकतील. ३१ डिसेंबर १९५१ रोजीं सर्व बँकांकडे मिळून, कारखाने व उद्योगधंदे यांच्या खातीं ५० कोटी रुपयांची ठेव जमा होती. बँकांनीं उद्योगधंद्यांना दिलेल्या कर्जाचा आंकडा याच तारखेला २०१ कोटी रुपये होता. हें कर्ज अर्थातच योग्य तारणावर खेळतें भांडवल म्हणून अल्प मुदतीनें दिलें होतें. ३१ डिसेंबर १९५० रोजीं मात्र हा कर्जाचा आंकडा १६० कोटी रुपयांचा होता. ठेवींचा आंकडा तोच होता. या आंकड्यांवरून या क्षेत्रांतील बँकांचें कार्य व त्यांतील संभाव्य चढ-उतार यांची कल्पना येऊं शकेल.

खाजगी भांडवलाच्या गुंतवणीसंबंधींच्या सरकारच्या धोरणाचे निषेधक व प्रवर्तक असे दोन भाग करतां येतील. कांहीं विशिष्ट धंद्यांत भांडवलाची गुंतवण होतां कामा नये किंवा अमुक इतक्या प्रमाणांतच ती झाली पाहिजे, असा निषेध सरकारला जारी करतां येईल. परंतु विशिष्ट उद्योग-धंद्यांत भांडवलाची विशिष्ट गुंतवण झालीच पाहिजे असा प्रवर्तक आग्रह धरण्याचें साधन आज भारत-सरकारच्या हातीं नाहीं. असें साधन जोंपर्यंत सरकारच्या हातीं नाहीं तोंपर्यंत योजिलेली वाढ निश्चितपणें होऊं शकेलच अशी ग्वाही देतां येत नाहीं. नवीन योजना मांडतांना नियोजनमंडळानें ४२ उद्योग-धंद्यांच्या प्रतिनिधींशीं तपशीलवार वाटाघाटी करूनच उत्पादनवाढीचे अंदाज बांधलेले आहेत, ही गोष्ट खरी. परंतु खाजगी भांडवलदारांचें धोरण बदलणार नाहीं असें कोण सांगूं शकेल ? सरकारवर दबाव आणण्यासाठीं ते भांडवलाची गुंतवण रोखून धरूं शकतील. नफ्याचें प्रमाण, मजूरविषयक धोरण हींहि योग्य वाटलीं नाहींत तर ते उत्पादन अडवून धरतील वा नवीन उत्पादन हातीं घेणार नाहींत. भांडवलाच्या गुंतवणीच्या दृष्टीनें भांडवलदारांवरील कराचा बोजा वाढवूं नये अशा सूचना ' कोलंबो-योजने ' पासूनच येऊं लागल्या होत्या. त्या सूचना आतां मान्य झाल्या आहेत असें समजावयास हरकत नाहीं. आर्थिक समता साधण्याच्या प्रयत्नांत यामुळें कशा अडचणी निर्माण होतात हें विशद करावयास नको.

लेखाच्या सुरुवातीला सांगितलेल्या योजनेच्या सर्व मर्यादा मान्य करूनहि या क्षेत्रांत सरकारनें आपल्या हातीं कांहीं आग्रही प्रवर्तक अधिकार ठेवण्याची आवश्यकता होती, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

### सर्वांना पुरेसें काम व वेतन

भारताचा प्रश्न हा केवळ उत्पादनवाढीचाच प्रश्न नाहीं. सर्वांना पुरेसें काम व वेतन मिळवून देणें हा या प्रश्नाचा एक महत्त्वाचा भाग आहे. शेतकीवर








अवलंबून असणाऱ्या अ-प्रगत राष्ट्रांत संपूर्ण बेकार राहण्याची आपत्ति फार लोकांवर येत नाहीं. कारण ' काळी आई ' अखेर सर्वांना आधार द्यावयास उभी असतेच. अधिकाधिक लोक तिचा आसरा घ्यावयास आले कीं तिच्यावरील भार वाढत जातो एवढेंच. परंतु अगदींच बेकार होऊन अन्नाला बाराहि महिने पूर्णपणें मोताद होण्याची पाळी कोणावर येत नाहीं. परंतु जमिनीचा लहान तुकडा अनेकांनीं मिळून कसण्यांत सर्वांना पुरेसें कामहि मिळत नाहीं, पुरेसें वेतन-उत्पन्नहि मिळूं शकत नाहीं. या लोकांना पूरक उत्पन्नाचीं साधनें उपलब्ध करुन देणें व या संख्येपैकीं शेतीच्या मशागतीसाठीं अनावश्यक असणाऱ्या लोकांना निर्वाहाचीं इतर व्यवसायक्षेत्रें निर्माण करणें असा दुहेरी उपाय योजिल्याखेरीज हा प्रश्न सुटूं शकणार नाहीं. आजच भारतांत या प्रश्नाचें स्वरूप असें आहे. आपली लोकसंख्या प्रतिवर्षीं १¼ टक्क्यांनीं वाढत आहे. पुढील तीस वर्षांच्या कालांत तरी लोकसंख्येच्या वाढीच्या या प्रमाणांत घट होईल अशी अपेक्षा बाळगावयास नको. नियोजनमंडळानेंहि अशी अपेक्षा ठेवलेली नाहीं. परंतु प्रत्यक्षांत या वाढीमुळें केवढा मोठा प्रश्न निर्माण होतो हें पाहिलें म्हणजे भीति वाटल्याखेरीज राहत नाहीं. लोकसंख्येच्या वाढीच्या या प्रमाणानें ३० वर्षांच्या काळांत आपल्याला आणखी सुमारें १० कोटी लोकांची तरतूद करावी लागेल.

घरगुती व लहान उद्योगधंद्यांना यामुळेंच भारताच्या अर्थव्यवस्थेंत महत्त्वाचें स्थान आहे. (भांडवलाच्या एकूण तुटवड्यामुळेंहि कमी भांडवल लागणाऱ्या या उत्पादनपद्धतीचा उपयोग करणें आवश्यक आहे हेंहि दुसरें कारण आहेच.) नियोजन-मंडळानें ही गोष्ट मान्य केली आहे. यासाठीं मदत म्हणून योजनेंत २७ कोटी रुपयांची केलेली तरतूद मात्र अगदीं अपुरी वाटते. प्रत्यक्ष पैशाच्या मदती-खेरीज पुढील मार्गांनींहि या उद्योगधंद्यांना मदत करण्यांत येणार आहे : ( १ ) कांहीं उत्पादन या उद्योगधंद्यांसाठींच राखून ठेवण्यांत येईल. ( २ ) मोठ्या कारखान्यांचें उत्पादन एका विशिष्ट मर्यादेपलीकडे वाढूं दिलें जाणार नाहीं. ( ३ ) मोठ्या कारखान्यावर उत्पादन-कर लादून त्या उत्पादनांतून लहान उद्योगधंद्यांना मदत दिली जाईल. ( ४ ) कच्च्या मालाच्या पुरवठ्याची सोय. ( ५ ) संशोधन-शिक्षणविषयक मदत.

भारताचा योजनाबद्ध विकास जसजसा होत जाईल तसतशीं खालील प्रमाणांत अधिक लोकांना दर वर्षीं कामें मिळूं शकतील असा आतांच्या योजनेंत अंदाज व्यक्त करण्यांत आलेला आहे. पुढील कोष्टकांत किती अधिक लोकांना काम मिळूं शकेल याचे आंकडे दिले आहेत :

( आंकडे लक्षांचे )

| | |
|---|---|
| १ मोठे व लहान कारखाने | ४ |
| २ धरण व विद्युत्-योजना | ७½ |
| ३ शेती : नवीन भिजलेल्या जमिनीवर | १४ |
| तळ्यांची दुरुस्ती | १½ |
| पडीत जमीनीची मशागत | ७½ |
| ४ बांधकाम | १ |
| ५ रस्तेबांधणी | २ |
| ६ घरगुती उद्योगधंदे | २० |

( या खेरीज ३६ लक्ष लोकांना घरगुती धंद्यां-पासून पूरक धंदा म्हणून प्राप्ति होऊं लागेल. )

७ प्रगत व्यवसाय ( अंदाज सांगतां येत नाहीं. )

वरील आंकडे केवळ ढोबळ अंदाज आहेत. नियोजनमंडळालाहि याची जाणीव आहे. परंतु हे ढोबळ आंकडे मांडूनहि नियोजनमंडळाला काय सुचवावयाचें आहे तें कळत नाहीं. शेतीवर अव-लंबून असलेली लोकसंख्याच वाजवीहून किती तरी अधिक आहे. मग कसावयाच्या जमिनीचें क्षेत्र वाढलें तरी नवीन लोकांना त्यांत पुरेसा वाव कसा मिळणार ? धरणें, बांधकाम यांच्यावरील कामें निरंतर चालूं राहणार आहेत काय? घरगुती उद्योगधंद्यांसंबंधींचा आंकडाहि असाच एक आशावादी अंदाज दिसतो. प्रश्न नियोजनमंडळा-च्या जाणिवेच्या कक्षेंत आलेला आहे, परंतु त्याचें उत्तर त्याला सांपडलेलें नाहीं, असाच निष्कर्ष यावरून काढावा लागतो. यांत नियोजनमंडळाला फार दोष देण्याचें कारण नाहीं. ही परिस्थितीचीच आजची अपरिहार्यता आहे.

सुशिक्षित लोकांच्या बेकारीचाहि नियोजन-



अनुक्रमणिका






मंडळानें उल्लेख केला आहे. सुशिक्षितांवर बेकारीचा प्रसंग येणें हा नियोजनाचा पराभवच होय, असें मानावयास हरकत नाहीं. राष्ट्राच्या गरजा व शिक्षणप्रसार यांची सहयोगिता आपल्याला साधतां आली नाहीं, असाच या बेकारीचा अर्थ होऊं शकेल.

**अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक विकासाची यंत्रणा**

अ-प्रगत राष्ट्रांचा आर्थिक विकास झपाट्यानें साधावयाचा असेल तर त्यासाठीं सुसंघटित परकीय मदतीची फार आवश्यकता आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर राजकीय कारणामुळें अ-प्रगत राष्ट्रांतील आर्थिक प्रश्नांबद्दल सर्व राष्ट्रांना आस्था वाटूं लागली. जगांतील सर्व लोकांच्या आर्थिक व सामाजिक प्रगतीसाठीं आवश्यक ती यंत्रणा निर्माण करण्याचें ध्येय 'संयुक्त राष्ट्रसंघा'च्या सनदेंत नमूद करून ठेवण्यांत आलें आहे. त्या दृष्टीनें आजवर कांहीं प्रयत्नहि 'संयुक्त राष्ट्रसंघा'मार्फत झालेले आहेत. UNRRA, W.H.O., I.L.O., F.A.O.—अशा संस्थांचें कार्य या स्वरूपाचें म्हणून दाखवितां येईल. परंतु या संस्थांचें कार्य एकेका विशिष्ट क्षेत्रांतच झालें आहे. सर्वांगीण विकासाच्या एकसूत्रतेचा प्रयत्न त्यांच्या कार्यांतून प्रत्ययाला येत नाहीं. याखेरीज अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक विकासासाठीं एकूण करावयाच्या कार्याच्या मानानें त्यांचें कार्य फारच तोकडें आहे.

आर्थिक क्षेत्रांत विशेष काम करणाऱ्या आन्तरराष्ट्रीय संस्था म्हणजे आन्तरराष्ट्रीय बँक ( International Bank for Reconstruction and Development ) व आन्तरराष्ट्रीय चलननिधि (International Monetary Fund) या होत. (अमेरिकेंतील Export-Import बँक ही एक आन्तरराष्ट्रीय भांडवलाच्या व्यवहाराची मोठ्या प्रमाणावर उलाढाल करणारी संस्था आहे. परंतु ही संस्था अधिक प्रत्यक्षपणें अमेरिकेच्या सरकारच्या आदेशानुसार आपलें धोरण ठरवीत असते. त्यामुळें आन्तरराष्ट्रीय संस्था या सदराखालीं ती यथार्थपणें येऊं शकणार नाहीं. एरव्हीं, आज सर्वच आन्तरराष्ट्रीय संस्था अमेरिकेच्या प्रगट वा प्रच्छन्न वर्चस्वाखालीं आहेत ही गोष्ट वेगळी.) I.M.F. व इंटरनॅशनल बँक यांपैकीं अ-प्रगत राष्ट्रांना भांडवल पुरविण्याच्या दृष्टीनें इंटरनॅशनल बँक ही संस्था महत्त्वाची आहे. परंतु या संस्थेमार्फत मिळूं शकणाऱ्या मदतीवर पुष्कळच मर्यादा पडतात. अ-प्रगत राष्ट्रांच्या गरजेच्या मानानें या संस्थेची मदत देण्याची शक्ति किती तरी अपुरी आहे. अ-प्रगत राष्ट्रांची एकूण गरज ३००० कोटी डॉलर्सच्या मदतीची आहे. ( उदा०---लॅटिन अमेरिका ४०० कोटी, आफ्रिका ३०० कोटी, आग्नेय आशिया १००० कोटी ). याउलट आन्तरराष्ट्रीय बँकेकडे कर्ज म्हणून द्यावयास हातीं असलेला निधि केवळ ६० कोटी डॉलर्सचा आहे. या निधीपैकीं कांहीं भाग पश्चिम यूरोपच्या मदतीसाठींहि कारणीं लागावयाचा आहे. अ-प्रगत राष्ट्रांसाठीं राहणारी रक्कम त्यामुळें अर्थातच आणखी कमी होणार. त्याचप्रमाणें या बँकेचे व्यवहार हे बँकव्यवसायाच्या सर्वमान्य सिद्धांतांना धरूनच व्हावेत अशी अपेक्षा असल्यामुळेंहि बँकेच्या कार्यक्षेत्रावर खूपच बंधन पडतें. अ-प्रगत राष्ट्रांत प्राथमिक पायाभूत अशी बांधणी करावयासाठींच ( धरणें, वाहतूक इत्यादीसाठीं ) बरेचसें भांडवल गुंतवावें लागतें. बरेचसें भांडवल असें लांब मुदतीनें गुंतविणें बँकेला शक्य होणार नाहीं.

या सर्व कारणांमुळेंच यूनोच्या तज्ज्ञ-समितीच्या 'अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक विकासा'वरील अहवालांत अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक मदतीसाठीं एक स्वतंत्र 'आन्तरराष्ट्रीय आर्थिक विकाससंस्था' ( International Development Authority ) असावी अशी सूचना करण्यांत आली होती. या सूचनेला कोणत्याच प्रगत राष्ट्राचा पाठिंबा मिळाला नाहीं. अशी योजना आंतरराष्ट्रीय म्हटली तरी तिचा खरा सर्व भार अमेरिकेवर पडतो. यामुळें इतर प्रगत राष्ट्रांकडून या संस्थेला कांहीं प्रमाणांत भांडवल मिळण्याची शक्यता असल्यासच अशी नवीन संस्था काढण्यानें कांहीं विशेष साधल्यासारखें होईल, एरव्हीं तिची आवश्यकता नाहीं, अशी भूमिका साहजिकपणेंच अमेरिकेनें घेतली. इतर प्रगत राष्ट्रांनीं युद्धाच्या तयारीसाठीं कराव्या लागणाऱ्या खर्चामुळें आपल्या-








कडे आर्थिक शिल्लक नाहीं व आहे ती संबंधी राष्ट्रें व वसाहती यांच्या मदतीसाठीं आवश्यक आहे असें सांगितलें. सूचना अर्थात् तेवढ्यावरच राहिली.

परकीय मदतीविषयींच्या अशा सर्व अपेक्षा कोणत्याहि स्वाभिमानी राष्ट्राच्या नियोजनांत प्रकट-पणें मांडणें शक्य नसतें. परंतु प्रश्नांचा सर्वांगीण विचार करतांना, ही बाजू मनांत वागविलीच पाहिजे. किंबहुना आजची गरज तर अशा संस्थेच्या स्थापनेनेंहि भागण्यासारखी नाहीं. राष्ट्रीय नियोजन व आन्तरराष्ट्रीय अर्थकारण-राजकारण यांचे संबंध यापुढें अधिकाधिक गुंतागुंतीचे होत जातील असें दिसतें. भांडवलाच्या आंतरराष्ट्रीय प्रवाहाचें महत्त्व तर आपण पाहिलेंच. आंतरराष्ट्रीय व्यापाराचाहि नीट विचार झाला पाहिजे. अ-प्रगत राष्ट्रांचा जसजसा औद्योगिक विकास होत जाईल तसतसा अ-प्रगत व प्रगत राष्ट्रांच्या परस्परांशीं होणाऱ्या व्यापारावर त्याचा परिणाम झाल्याबांचून राहणार नाहीं. या विकासाचे परिणाम प्रगत राष्ट्रांना प्रथम तरी प्रतिकूल असेच जाणवतील. आजची आन्तरराष्ट्रीय व्यापाराची घडी विसकटून जाईल. नवीन घडी बसवितां येईल. अन्तीं सर्वांना ती अधिक सुखकरहि होईल. परंतु मधल्या स्थित्यंतरा-च्या काळांत अकारण स्पर्धा किंवा द्वेष यांना वाव मिळूं नये याविषयीं जागरूकपणें प्रयत्न केले पाहिजेत. आज असा विचार चालू असल्याचें दिसत नाहीं. आजच्या परिस्थितींत तर आंतर-राष्ट्रीय सहकार्यानें याहि पुढचीं महत्त्वाचीं पावलें टाकणें निकडीचें आहे. तीं पावलें अशीं : (१) वर्गा-वर्गांतील आर्थिक विषमता दूर करण्याप्रमाणेंच राष्ट्राराष्ट्रांतील प्रचंड आर्थिक विषमता दूर कर-ण्याचा ध्येयवादी हेतुपुरस्सर प्रयत्न करणें. (२) जादा लोकसंख्येच्या देशांतील लोकांना कमी वस्तीच्या देशांत वसाहती करण्यासाठीं वाव देणें. (३) आद्य महत्त्वाच्या मालाच्या उत्पादनाचें जागतिक नियंत्रण व योग्य प्रमाणांत सर्व राष्ट्रांस वांटप (उदा० अणुशक्ति, तेल, रबर).—या गोष्टींचा नुसता उल्लेख केला तरीहि हास्यास्पद वाटावें इतकी आपल्या जड मनावरील जुनाट विचारांची पकड आज कायम आहे. मानवाला शहाणपण एक शतक उशीरा सुचूं लागतें हीच गोष्ट खरी.

## भूदान—आणि पुढें संपत्तिदान

आपण अधिक पुढें जाऊन संपत्तींतील कांहीं हिस्स्याची मागणी केली नाहीं तर भूदान-आंदोलना-मागील तत्त्वाची पूर्ति होणार नाहीं याची वाढती जाणीव, भूदान-यज्ञाची जसजशी प्रगति होत गेली तसतशी मला होऊं लागली. म्हणून मीं मनाशीं निश्चय केला कीं, आतां संपत्तिदानाचेंहि आवाहन जनतेला करावयाचें. मी संपत्तीचा सहावा हिस्सा मागत असतों. परंतु किती दान करावयाचें तें जनतेनेंच ठरवावयाचें आहे. व्यक्तिगत प्रयत्नानें वा कुशलतेनें जरी आपण धन मिळविलें तरी तें केवळ आपल्या स्वतःपुरतें नाहीं, ईश्वरानें सर्व समाजाच्या उपयोगासाठीं तें आपणांस दिलें आहे, हें तत्त्व माझ्या संपत्ति-दानाच्या मागणीमागें आहे. कारण धनोत्पादनामागील शक्ति व प्रेरणा हीच मुळीं ईश्वरदत्त देणगी आहे असें मी मानतों. सार्वजनिक कार्यपूर्त्यर्थ जमविलेल्या निधीचा ट्रस्ट बनविण्याची माझी कल्पना नाहीं. सार्वजनिक निधींत व माझ्या संपत्ति-यज्ञांत एक महत्त्वाचा फरक आहे. माझ्या संपत्ति-यज्ञांत दान करणाऱ्याला पुढें प्रतिवर्षी आपल्या मिळकतीचा कांहीं भाग देत राहावा लागेल. म्हणून दात्यानें दिलेली संपत्ति त्याच्या-जवळच ठेवावी आणि तिचा उपयोग त्यानें आमच्या सूचनेनुसारच करून, त्याचा दरवर्षी हिशेब द्यावा असें मीं योजिलें आहे. त्यायोगें दाता आपल्या केवळ संपत्तीचाच कांहीं भाग देत नाहीं तर आपल्या बुद्धिमत्तेचा व कौशल्याचाहि तो उपयोग करून देतो. आमच्या इच्छेनुसार दात्यानें दिलेल्या संपत्तीचा विनियोग करावा अशी जरी योजना असली, तरी त्यानें संपत्तीच्या विनियोगासंबंधीं स्वतःहि अवश्य सूचना कराव्या. दात्याच्या प्रामाणिकपणावर पूर्ण विश्वास ठेवून मी त्याच्यावरच सर्व जबाबदारी टाकीत असतों. टीकाकारांना ही पद्धत सदोष वाटेल. पण विश्वासाशिवाय चांगुलपणा कसा निर्माण होईल?

—आचार्य विनोबा








प्रा. गं. बा. सरदार व श्री. दि. के. बेडेकर

# मराठी वाङ्मय व भाषा यांच्या इतिहासाची योजना

[ पुणें येथील ' महाराष्ट्र साहित्यपरिषदे 'नें मराठी वाङ्मयाच्या इतिहासाची एक योजना आंखली आहे. प्रस्तुत लेखांत लेखकांनीं त्या योजनेचें स्वरूप मांडलें असून, परिषदेची ती योजना त्यांच्या दृष्टीनें वाङ्मयेतिहासाच्या शास्त्रशुद्ध भूमिकेवरून पाहतां कशी सदोष आहे, याचें दिग्दर्शन केलें आहे. त्याचबरोबर मराठी वाङ्मयेतिहासाची शास्त्रशुद्ध रूपरेषा कशी असावी याबद्दलची योजनाहि त्यांनीं प्रस्तुत लेखांत सुचविली आहे. प्रस्तुत लेखांत व्यक्त केलेले विचार लेखकांनीं ' महाराष्ट्र साहित्यपरिषदे 'च्या अधिकाऱ्यांकडे यापूर्वींच कळविले असून, त्यांना परिषदेच्या प्रसिद्ध योजनेचा या नवीन योजनेच्या दृष्टीनें फेरविचार करण्यासंबंधीं विनंति केली असल्याचें समजतें. आपली ही योजना परिषदेच्या अधिकाऱ्यांकडे पाठविण्यापूर्वीं, प्रा. गं. बा. सरदार व श्री. दि. के. बेडेकर यांनीं साहित्येतिहास या विषयांतील कांहीं तज्ज्ञ, आस्थेवाईक अभ्यासू व साहित्यप्रेमी लोकांपुढें ती मांडली व त्यांतील बहुतेकांनीं परिषदेची योजना खंडविभागणी व नामकरण या दृष्टींनीं सदोष असल्याबद्दल ऐकमत्य व्यक्त केलें, असें कळतें. मराठी वाङ्मयाचा इतिहास अधिकारी तज्ज्ञांच्या सहकार्यानें विचारपूर्वक तयार करून घेण्याची योजना प्रत्येक मराठी भाषिकाला स्वागतार्हच वाटेल. अशी विशाल योजना आंखून ती पार पाडण्याला ' महाराष्ट्र साहित्यपरिषद् ' ही संस्था उद्युक्त झाली आहे, हें निःसंशय अभिनंदनीय होय. अशा वेळीं वाङ्मयेतिहासरचनेचीं शास्त्रशुद्ध तत्त्वें कोणतीं, मराठी वाङ्मयेतिहास कसा लिहिला जावा, मराठी वाङ्मयेतिहासयोजना शक्य तितकी निर्दोष कशी करतां येईल या विषयांवर चर्चा होणें अवश्य आहे. त्या दृष्टीनें प्रस्तुत लेखांत व्यक्त केलेले विचार वाचकांस निःसंशय उद्बोधक वाटतील.—का. सं. ]

मराठी वाङ्मय व भाषा यांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांस व अध्यापकांसहि आज या विषयांची समग्र व सुसंगत मांडणी ज्यांत असेल अशा इतिहासग्रंथाची गरज भासत आहे. असा इतिहासग्रंथ सर्वांना उपलब्ध करून देण्याची जबाबदारी पार पाडण्यासाठीं साऱ्या मराठी जनतेच्या व अनेक अभ्यासकांच्या मदतीची तर जरुरी आहेच; शिवाय मराठी मुलखांचा समावेश असलेलीं राज्यसरकारें, मुंबई, पुणें इत्यादि ठिकाणचीं विद्यापीठें आणि पश्चिम महाराष्ट्र, महाविदर्भ, मराठवाडा व गोमांतक या महाराष्ट्र-विभागांतून कार्य करणाऱ्या साहित्य-संस्था—या सर्वांच्या सहकार्यानें व प्रत्यक्ष साहाय्यानेंच हें मोठें काम सिद्ध होण्यासारखें आहे.

या कामांत पुढाकार घेऊन अशा इतिहास-ग्रंथाची योजना हातीं घेण्याचें श्रेय ' महाराष्ट्र साहित्यपरिषदे 'नें घेतलें आहे ही आनंदाची गोष्ट आहे. गेलीं पांच वर्षें या ग्रंथाच्या स्वरूपासंबंधीं विचारविनिमय झाला असून, आज त्याचें फल म्हणून एक सुमारें ५५०० पानांचा, एकादश खंड असलेला इतिहासग्रंथ तयार करण्याची योजना सिद्ध झाली आहे. या योजनेला अनुसरून प्रत्यक्ष ग्रंथ-लेखनाचें व संपादनाचें कार्यहि आतां सुरू होत आहे.

योजना सिद्ध करून प्रत्यक्ष लेखनाच्या कामाला








# मराठी वाङ्मय व भाषा यांच्या इतिहासाची योजना

सुरुवात होत आहे, अशा वेळीं जर पुन्हां योजनेबद्दल फेरविचार करावयाचें म्हटलें तर ग्रंथलेखनाचा प्रारंभच स्थगित केल्यासारखें होईल. आहे ती योजना सदोष असेल, तर प्रत्यक्ष लेखन करणाऱ्या संपादकांना व सह-संपादकांना दोषांची जाणीव होईल व आढळेल तो दोष टाळीत लेखनाचें कार्य चालूं ठेवतां येईल, असा विचार आमच्याहि पुढें प्रथम होता. पण समोर असलेल्या योजनेचा जास्त विचार करतां आम्हांला असें वाटलें कीं, प्रारंभालाच थोडा-फार विलंब होण्याची आपत्ति पत्करूनहि योजनेचा पुन्हां विचार होणेंच आवश्यक आहे. येतील तसे निवारण्याचे व तपशिलाचे दोष कोणच्याहि ढोबळ योजनेंत राहतीलच. पण प्रस्तुत योजनेंतील दोष तपशिलाचे नसून रचनेचे आहेत असें वाटूनच आम्ही आपली भूमिका मांडण्याचें हें धाष्टर्य करीत आहोंत.

या इतिहास-ग्रंथाचे खंड अकरा असावेत कीं कमी-जास्त असावेत हा प्रश्न महत्त्वाचा नाहीं. तसेंच अमुक खंडास अमुक व्यक्तीचें नांव द्यावें कीं नाहीं हाहि प्रश्न गौण आहे. अशा बारीक तपशिलांचा प्रश्न असता तर मग योजनेचा फेरविचार करण्याची भूमिका आम्हींच घेतली नसती. पण आधींच नमूद केल्याप्रमाणें, एकंदर ग्रंथाच्या स्वरूपाबद्दल व रचनेबद्दलच आम्हांला कांहीं म्हणावयाचें आहे; मग त्या अनुषंगानें खंडांची संख्या, नामकरणें व एकन्दर ग्रंथविस्तार या बाबतींत आम्ही सिद्ध योजनेवर आक्षेप घेऊन कांहीं नवी व्यवस्था सुचविली आहे.

## वाङ्मयेतिहासरचनेचीं कांहीं विश्रुत तत्त्वें

अकरा खंडांचे नियोजित संपादक व सह-संपादक यांच्याकडे धाडण्यांत आलेला ढोबळ आराखडाच आमच्यासमोर आहे. या एकंदर योजनेवर आम्हांला जी टीका करावयाची आहे, ती टीका खालील मुद्दयांवर आहे : १. कालक्रम व अवस्थाक्रम २. ग्रंथ-विस्तार. ही टीका करतांना सर्वविश्रुत असलेल्याच अशा कांहीं इतिहासविषयक तत्त्वांचा उल्लेख प्रथम करणें योग्य होईल. आमच्या विवेचनाच्या सोयीसाठीं या तत्त्वांची मांडणी करतांना आम्हांला ही जाणीव आहे कीं, सिद्ध योजनेच्या मागेंहि हींच तत्त्वें विचारांत घेतलीं गेलीं आहेत. परंतु त्या तत्त्वांच्या व्यवहाराबद्दलचा हा मतभेद स्पष्ट होण्यासाठीं त्या तत्त्वांची येथें मांडणी करणें आम्हांला जरूर वाटतें.

एकेक व्यक्ति, पंथ, वाङ्मयप्रकार किंवा ग्रंथ यांच्या भोंवतीं तपशीलवार संशोधन होऊन पुराव्यानिशीं माहिती संकलित होण्याला महत्त्व आहे हें खरें. या संशोधनाच्या मार्गानेंच इतिहासाचीं साधनें निर्माण होतात. ही साधन-संकलनाची क्रियाहि कधीं थांबूं शकत नाहीं. नवी नवी सामग्री उजेडांत येत असते. तिच्यामुळें जुन्या सामग्रीची पुन्हां निवड व संगति लावावी लागते व मग आणखी नव्या सामग्रीचा शोध सुरू ठेवावा लागतो. परंतु, या साधन-संकलनाच्या कार्यापेक्षां इतिहास-रचनेचें कार्य भिन्न आहे. इतिहास-रचनेला मार्गदर्शक ठरतील अशीं अनुमानें संकलनकारहि काढीत जातातच. किंबहुना, संकलनाच्या अगदीं प्रारंभकालांत निरंकुश अशा अनुमानांना व सिद्धान्तांना एक प्रकारें अनुकूल भूमिच असते. ही गोष्ट मराठी इतिहासाच्या व संतवाङ्मयाच्या क्षेत्रांत आपल्या अनुभवास आली आहे. परंतु साधन-संकलनाच्या कार्यापेक्षां इतिहास-रचनेचें कार्य भिन्न आहे, या मुद्दयालाच अशा या अनुमानामुळें बळकटी येते. स्फुट अशा संकलनापेक्षां व त्यावरच आधारलेल्या स्फुट अशा अनुमानांपेक्षां इतिहास वेगळा असतो. इतिहासामध्यें निश्चिति असते व स्फुट माहितीची निवड व रचना करून एक अनुसंधान साधलेलें असतें.

हें अनुसंधान कालक्रमाच्या व अवस्थाक्रमाच्या अशा दुहेरी पण एकजीव पद्धतीनें साधलें म्हणजे इतिहास सिद्ध होतो. केवळ कालगणनेचा मानदंड वापरून शतकांचीं किंवा दशकांचीं समप्रमाणांत घरें तयार करून त्यांत स्फुट माहितीचीच विभागणी करणें हा एक उपक्रम होईल. पण तें इतिहासरचनेचें विडंबन होईल ! एखाद्या वृक्षाचें वर्णन करतांना बीजारोपण, शाखाविस्तार व फलसमृद्धि यांचें वर्णन न करतां केवळ फुटाफुटांनीं त्याच्या उंचींत झालेली वाढच तेवढी नमूद करणें हें जसें हास्यास्पद होईल त्याप्रमाणें केवळ कालगणनेची पद्धति निर्जीव ठरेल.

वभा०



अनुक्रमणिका

परंतु हेंहि खरें कीं कालक्रमाशिवाय इतिहासाच्या रचनेला कणाच राहणार नाहीं. एकेका व्यक्तीचा किंवा घटनेचा अर्थ लावण्यासाठीं पूर्व आणि उत्तर कालांतील व्यक्तींशीं व घटनांशीं त्याचा संबंध, साम्यविरोध आणि कार्यकारणभाव दाखविणें जरूर असतें. यासाठींच आधीं व नंतर ह्या कालसापेक्षते-च्याच अवलंब करावा लागतो व म्हणून कालक्रम ही इतिहासरचनेची प्राथमिक पण आवश्यक भूमि आहे.

कालक्रमाच्या प्राथमिक भूमीच्या आधारानें त्या त्या कालखंडांतील स्फुट बाबींना अधिष्ठानरूप असलेल्या वैशिष्ट्यांचा, प्रवृत्तींचा व अवस्थांचा इतिहासज्ञांस विचार करावा लागतो. एकेका कालखंडांतील वाङ्मयाला प्राणरूप होऊन व्यापून टाकणाऱ्या मूलभूत तत्त्वांचा शोध घेऊन त्या तत्त्वांचें स्फुरण एकेका व्यक्तीच्या कृतींत, एकेका वाङ्मयप्रकरणांत व एकेका साहित्यकृतींत किती कमीजास्तपणें आढळतें हें इतिहासांत नमूद झालें पाहिजे. या प्राणरूप तत्त्वांच्याच पोटीं भावी कालखंडांतील प्राणतत्त्वांचा प्रादुर्भाव कसा व केव्हां दिसूं लागतो व नवीं प्राणतत्त्वें केव्हां व कशीं प्रभावी होऊं लागतात याचा निर्देश या विवेचनांत हवा; त्याचप्रमाणें मागील कालखंडांच्या प्राणतत्त्वांशीं असलेला अनुबंधहि स्पष्ट व्हावयास हवा.

सारांश, कालक्रमाच्या प्राथमिक आधारानें वाङ्मयांतील प्राणरूप तत्त्वांच्या विकासाचा शोध घेणें व अवस्थाक्रम निश्चित करणें हें इतिहासरचनेचें कार्य आहे. वाङ्मयाच्या अंतर्बाह्य विकासाचें समग्र ज्ञान होणें हें त्याचें फल आहे.

## साहित्यपरिषदेची योजना

वाङ्मयेतिहाससंबंधींचीं वरील तत्त्वें सिद्ध योजनें-त अवलंबिलेलीं आहेत काय हा आपल्यापुढें आतां प्रश्न आहे. आपल्यासमोर असलेल्या अकरा खंडां-पैकीं शेवटचा 'भाषा–व्याकरण खंड' हा कोण-त्याहि योजनेंत सुटा व स्वतंत्रच राहील. तेव्हां खरा प्रश्न पहिल्या दहा खंडांचाच आहे. ह्या खंडांच्या विस्तारांत सन १००० पासून सन १९५० पर्यंतचा वाङ्मयेतिहास समाविष्ट आहे. हा सुमारें ९५० वर्षांतील मराठी वाङ्मयाचा इतिहास हाच प्रस्तुत चर्चेचा विषय आहे.

या ९५० वर्षांतील वाङ्मयाचे जे खंड सिद्ध योजनेंत कल्पिले आहेत ते असे :

१. महानुभाव खंड
२. ज्ञानेश्वर खंड
३. एकनाथ खंड
४. तुकाराम खंड
५. रामदास खंड
६. पंडितकवि खंड
७. शाहीर खंड
८. भाषांतर खंड
९. चिपळूणकर खंड
१०. ललित-वाङ्मय खंड

कालक्रम आणि अवस्थाक्रम यांच्या अन्वयानें साधलेलें अनुसंधान व सूत्र आम्हांला या विभागणीमध्यें दिसत नाहीं. यांत महानुभाव वाङ्मयाचा एक स्वतंत्र खंड आहे; ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास व चिपळूणकर या व्यक्तींच्या भोंवतीं कल्पिलेले खंड आहेत; पंडित-कवि व शाहीर यांच्या विशिष्ट शैलींना प्राधान्य देऊन कांहीं खंड आहेत; तसेंच भाषांतर व ललित वाङ्मयप्रकारांनाच केंद्र धरून दोन खंड करण्यांत आले आहेत. थोडक्यांत सांगावयाचें, तर या विभागणींत व्यक्ती, पंथ, शैली व प्रकार या गोष्टींवर भर देण्यांत आला आहे व यांच्या सरमिसळीनें दहा खंडांची योजना सिद्ध करण्यांत आली आहे. साधनांचें संकलन करीत असतांना जशी माहिती मिळेल तशी संगृहीत करावी लागते व एकेका व्यक्तीचा, पंथाचा किंवा प्रकाराचा अभ्यास पुरा करीत जावा लागतो. हीच दृष्टि विशिष्ट व मर्यादि-त अभ्यासाच्या वेळींहि संशोधकाला स्वीकारावी लागते. परंतु ही संकलनकाराची व संशोधकाची वृत्ति इतिहासकारानें ठेवणें बरोबर होणार नाहीं. त्यानें कालक्रमाचें आणि अवस्थाक्रमाचें सूत्रच धरलें पाहिजे व तेंच नेमकें या योजनेंत दिसत नाहीं.

या दहा खंडांच्या विभागणीमुळें इतिहासलेखनां-त कसे दोष उत्पन्न होतील तें एक-दोन उदाहरणां-नीं दाखविणें शक्य आहे :

महानुभावी वाङ्मय ज्ञानेश्वरांच्या काळीं लिहिलेलें आहे, तसेंच तें सन १३५० नंतरच्या काळांतलेंहि आहे. या उत्तरकालीन महानुभावांनीं सांकेतिक लिपीचा आश्रय केला आहे. शिवाय त्यांच्या लेखनांत तंत्राचा बडेजाव, पांडित्यप्रदर्शनाची

इच्छा इत्यादि वैशिष्ट्यें आढळतात. महानुभाव खंडामध्यें या अवस्थांतराची दखल घेतां येईल. परंतु एकंदर मराठी वाङ्मयाच्या विकासाचें ज्ञान होण्यासाठीं हें अपुरें ठरेल. ज्ञानेश्वर-कालीन महानुभाववाङ्मयाचा समकालीन सर्वच वाङ्मयाशीं साम्यविरोध प्रथम स्पष्ट झाला पाहिजे व त्याच न्यायानें उत्तरकालीन महानुभावसाहित्याचा विचार झाला पाहिजे. सन १३५० नंतरच्या सर्वच मराठी वाङ्मयांत प्राथमिक काळांतील स्फूर्ति, साधेपणा वगैरे गुणांच्या जागीं पांडित्य व सजावट यांचा प्रभाव पडूं लागला कीं काय हें पाहिलें पाहिजे. म्हणजेच, उत्तरकालीन महानुभावांचीं वैशिष्ट्यें हीं केवळ त्यांच्या पंथ-वाङ्मयापुरतींच आहेत का एकंदर मराठी वाङ्मयांतीलच एका व्यापक स्थित्यंतराचा तो एक आविष्कारच आहे, हें नीट ठरवितां येईल. महानुभाव-वाङ्मयाचा एक खंड केल्यानें मध्ययुगीन मराठी वाङ्मयाला व्यापून टाकणाऱ्या प्रवृत्तींचा शोध व त्यांचा विकासक्रम पाहण्याचा प्रयत्न विफल होईल. एकेक खंड हा मोहोरबंद पेटीसारखा होऊन बसेल आणि शतकांशतकांतून अखंडपणें नांदणाऱ्या विकासाच्या सूत्राचें अवधान इतिहास रचणाऱ्यांनाच राहणार नाहीं; मग तें वाचकांना उमगणें तर दूरच राहिलें !

दुसरें उदाहरण, 'चिपळूणकर खंड' व 'ललित वाङ्मय खंड' यांचें घेऊं. असे खंड पाडल्यानें आधुनिक वाङ्मयाच्या विकासाचा अर्थ लागत नाहीं. गद्याचा जन्म आणि विस्तार प्रथम झाला आणि मग कादंबरी, काव्य इत्यादि ललित प्रकारांना भर आला असें ढोबळ मानानें म्हटलें तरी, आहेत त्या खंडांमुळें या क्रमाच्या मागील प्रेरणा व सूत्र उमगणें कसें सुलभ होईल ?

सारांश, सध्यांच्या दहा खंडांतून केवळ उपलब्ध संकलित माहितीचा सुलभतेनें संग्रह करणें हाच उद्देश असेल तर ते चांगले आहेत. कारण ढोबळ मानानें याच केंद्रांभोंवतीं आतांपर्यंत संशोधन झालें आहे. पण आहे ती सर्व माहिती नुसती ठाकठिकीनें खंडशः संगृहीत करावयाची नसेल व तिचें विश्लेषण करून तिला इतिहासाच्या सूत्रांत गोंवून एक सूत्रबद्ध नवरचना करावयाची असेल तर नवे खंडच कल्पिले पाहिजेत.

## नवे खंड कसे असावेत ?

आजचे दहा खंड न पाडतां नवे खंड कसे असावेत याची कल्पना आम्ही खालीं देत आहोंत :

### मराठी वाङ्मयाचा व भाषेचा इतिहास

#### भाग १ : मध्ययुगीन वाङ्मय

| खंड | इसवी सन | पृष्ठें (डेमी) |
|---|---|---|
| १. प्रारंभकाल | ( १०००–१३५० ) | २५० |
| २. मध्यकाल | ( १३५०–१६८० ) | ४०० |
| ३. उत्तरकाल | ( १६८०–१८०० ) | ३०० |
| ४. उपसंहार | ( मध्ययुगीन वाङ्मयाचा ) | १०० |

#### भाग २ : आधुनिक वाङ्मय

| | | |
|---|---|---|
| १. प्रारंभकाल | ( १८००–१८८० ) | २५० |
| २. मध्यकाल | ( १८८०–१९२० ) | ३५० |
| ३. उत्तरकाल | ( १९२०–१९४० ) | ३५० |
| ४. उपसंहार | ( आधुनिक वाङ्मयाचा ) | १०० |

#### भाग ३

| | |
|---|---|
| भाषेचा इतिहास, व्याकरण आणि पोटभाषा व बोली, म्हणी, लोकगीतें इत्यादी. | ३०० |
| तीन भाग मिळून | २४०० |

वरील विभागणींत व्यक्ती, पंथ व प्रकार गौण करून त्यांना कालक्रमाच्या सूत्रांत गोंवलेलें दिसेल. प्रत्येक कालखंडाची प्रकृति ठरविणाऱ्या व्यक्तींची, पंथांची किंवा प्रकारांची युगप्रवर्तक महती त्या त्या कालखंडांत सांगावीच लागेल. कारण ती स्वभाव-सिद्धच असते. परंतु मुख्य सूत्र कालाचें व काल-सापेक्ष अशा प्राणभूत तत्त्वांचें राहील.

वरील पद्धतीनें इतिहासाची रचना करतांना प्रथम, मध्ययुग व आधुनिक युग असे दोन ढोबळ भाग आम्हीं कल्पिले आहेत. सिद्ध योजनेंतहि हेच भाग अध्याहृत आहेत. महानुभावांपासून शाहिरां-पर्यंतचे सात खंड मध्ययुगीन आहेत व नंतरचे तीन खंड आधुनिक आहेत. तेव्हां या ढोबळ भागां-पुरता मतभेद नाहीं असें मानावयास हरकत नाहीं. पण या भागांच्या खंडशः विभागणीबद्दल मात्र








मतभेद आहे व तो स्पष्ट होण्यासाठीं थोडें विवेचन जरूर आहे व तें पुढें आम्ही करीत आहोंत.

## प्रेरणांच्या अवस्थांतरांचें दर्शन

भारतीय समाजव्यवस्थेंत आणि विचारांच्या व प्रेरणांच्या विश्वांत ग्राम आणि नगर अशा दोन संयुक्त परंतु स्वायत्त अशा संस्था किंवा अधिष्ठानें आहेत. यांपैकीं ग्रामीण जविन हें सर्वच दृष्टींनीं स्थिर व परंपरेला दृढतेनें खिळलेलें आहे. नागर जीवनांत मात्र नव्या प्रेरणांचा उद्भव, विकास व लय होत गेलेला दिसत आहे. धर्मपंथ, दर्शनें इत्यादिकांचा प्रपंच हा नागर अधिष्ठानावरच आधारलेला दिसतो व त्याचा विस्तार-संकोच ग्रामीण जीवनांत झालेला आढळतो. गुप्त-साम्राज्याच्या काळांत उत्तुंग दशेला पोंचलेल्या नागर संस्कृतीचा ऱ्हास होत होत, नवव्या-दहाव्या शतकापर्यंत आपल्याला नवजागृतीचीं चिन्हें दिसत नाहींत. पण मग एका नवीन प्रबोधनाची लाट साऱ्या भारतीय लोकसमूहांत व प्रदेशांत उठलेली दिसते. या प्रबोधनाचें त्रिविध स्वरूप असें दिसतें : ( १ ) एकभाषिक लोकसमूहांमध्यें लोकभाषेविषयीं अभिनिवेशाचा उद्गम. ( २ ) या एकभाषिक लोकसमूहांत या ना त्या दैवताविषयीं एकेश्वरवादी प्रेरणेनें प्रभावित झालेल्या भक्तिपंथीयांचा उदय. ( ३ ) याच लोकसमूहांतील नागर म्हणजे लढवय्या व पंडित वर्गांत आपापल्या प्रदेशांत स्वतंत्र राज्यें स्थापण्याच्या ईर्ष्येचा उद्भव. ही त्रिविध नवप्रेरणा नागर अधिष्ठानावरच उभी आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. परंतु या प्रेरणेमध्यें जें बळ आणि ओज आहे तें नागरमर्यादेंत कोंडून न राहतां ग्रामजीवनाकडे विस्तारूं लागलें असेंहि आपल्याला दिसत आहे.

या प्रबोधनाचें स्वरूप केवळ महाराष्ट्रापुरतें मर्यादित नाहीं, तर भारतीय अशा सर्वच प्रदेशांत ही लाट कमीजास्त वेगानें उठलेली व पसरलेली दिसते. या लाटेचें उत्थान महाराष्ट्रांत कसें झालें व कोणत्या घटकांना कसें कसें महत्त्व लाभत गेलें हें पाहणें म्हणजेच मध्ययुगीन महाराष्ट्राच्या सर्वांगीण इतिहासाचा विचार होय. प्राचीन काळापासून लोकांनीं पवित्र मानलेलें पंढरपूरचें क्षेत्र आणि वारीची परंपरा वैष्णव संतांनीं आत्मसात् कशी केली ? विठ्ठलभक्तीचा एकेश्वरपंथ प्रभावी कसा झाला ? तसेंच, मराठी भाषेचा दुर्दम्य अभिमान कसा निर्माण झाला ? नंतरच्या काळांत यशस्वी व मूर्त झालेली मराठी राज्याची कल्पना अस्फुट स्वरूपांत कशी उत्पन्न झाली व ती कसकशी स्फुट होत गेली ?—हे सारे प्रश्न आपल्या मध्ययुगीन इतिहासाचे मूळ प्रश्न आहेत. त्याच अनुषंगानें, महानुभाव-पंथाचा उद्गम, विस्तार व संकोच आपल्याला विशद होईल व त्या पंथाच्या वाङ्मयाचीं बदलतीं स्वरूपें ओळखतां येतील. ह्याच न्यायानें, इतर पंथांचा व वाङ्मयाचा विचार आपल्याला करावा लागेल.

एका भारतव्यापी सर्वंकष प्रबोधनाचा आविष्कार महाराष्ट्रांत, विशेषतः मराठी वाङ्मयांत कसकसा होत गेला, हें जर आपल्या वाङ्मयेतिहासाचें साध्य वा प्राणसूत्र असेल, तर मग मध्ययुगीन भागाची खंडशः विभागणी त्याच सूत्रानुसार करावी लागेल. म्हणजेच त्या नवोदित प्रेरणेचें प्रारंभींचें स्फूर्त, ओजस्वी आणि भावनात्मक स्वरूप वाङ्मयांत कसें मूर्त झालें, तिचें नंतरचें प्रौढ, संस्कारयुक्त व चिंतनात्मक अंतर्मुख स्वरूप मध्यकालांत कसें विकसित झालें आणि उत्तरकालामध्यें ती प्रेरणा पुन्हां रूढीच्या, तंत्राच्या व नागर कृत्रिमतेच्या आहारीं जाऊन निर्जीव कशी झाली, हें वाङ्मयेतिहासाच्या रूपानें आपण विशद केलें पाहिजे. एका प्रेरणेचीं किंवा प्राणतत्त्वाचीं तीन रूपें किंवा अवस्था मराठी वाङ्मयांत मूर्त झाल्या आहेत हें अनुसंधान जर ठेवलें, तर मग एकेका व्यक्तीच्या व पंथाच्या वाङ्मयाचें स्वरूप आपल्याला इतिहासाच्या कार्यकारणभावानें स्पष्ट करतां येईल.

हें अनुसंधान सतत डोळ्यांपुढें ठेवून जर इतिहासाची रचना करावयाची तर मग मध्ययुगीन वाङ्मयाचे प्रारंभ, मध्य व उत्तर असे खंड पाडणें प्राप्त होईल असें आम्हांस वाटतें.

आधुनिक भागाचे खंड पाडतांनाहि आम्हीं अशाच एका प्रबोधनाच्या विविध अवस्थांतरांचें सूत्र मनांत वागविलें आहे. हें प्रबोधन म्हणजे पाश्चात्य विद्येच्या प्रकाशामुळें भारतीय समाजाला

लाभलेलें प्रेरणांचें व साध्यांचें नवें विश्व होय. राष्ट्रवाद, व्यक्तिविकासवाद, समता, विवेकवाद अशा नवतत्वांचा स्वीकार करणारा सुशिक्षितवर्ग हा या प्रबोधनाचा अग्रदूत ठरला. त्यानें आधुनिक मराठी वाङ्मयाच्या निर्मितीला प्रारंभ केला. या प्रारंभकालांतून पुढच्या प्रौढ अवस्थेंत प्रवेश करून मराठी वाङ्मयानें जो टप्पा गांठला, तो आपल्याला चांगला परिचित आहेच. चिपळूणकर, आपटे, केशवसुतप्रभृतींनीं मराठी वाङ्मयाला जें प्रगल्भ स्वरूप दिलें त्याचाच विस्तार नंतरच्या काळांतील तंत्रनिष्ठ वाङ्मयांत झालेला आहे. ह्या नव्या विस्ताराची एक परिसीमा सन १९४० पर्यंतच्या वाङ्मयानें गांठली आणि मग मात्र नव्याच प्रेरणांची व अभिनिवेशांची लाट आलेली दिसते. सन १९४० पासून आतांपर्यंतच्या काळांत जी नवेपणाची ऊर्मि आहे तिचें बळ, ओज व प्रभाव यांचें मोजमाप अजून चांचपडत होत आहे व तसें होणें साहजिकच आहे. तेव्हां आज इतिहास रचावयाचा तर त्याची मर्यादा सन १९४० पर्यंतच आणून थांबवावी, असें आम्हांस वाटतें.

आधुनिक भागांतील वाङ्मयांत आढळणाऱ्या प्राणसूत्राच्या तीन अवस्था आम्हीं कल्पिल्या आहेत. त्या अवस्था मध्ययुगीन अवस्थांसारख्या आहेत. पण तें साम्य जुजबी आहे. निदान मध्ययुगांतील तिसरी अवस्था आणि आधुनिक युगांतील तिसरी—दोन महायुद्धांच्या मध्यंतरांतील अवस्था—यांत फार फरक आहे. हें स्पष्टीकरण आम्ही एवढ्यासाठीं येथें करीत आहोंत कीं, अवस्थांच्या त्रिविधतेचा एखादा सांचा आम्ही हट्टानें लादण्याचा प्रयत्न करीत नाहीं.

मध्ययुगीन भाग व आधुनिक भाग यांतील वाङ्मयाचा खंडशः विचार केल्यावर पुन्हां प्रत्येक भागांतील वाङ्मयाच्या एकंदर स्वरूपाचा व विकासक्रमाचा साकल्यानें विचार मांडला जावा, यासाठीं प्रत्येक भागाच्या शेवटीं आम्हीं उपसंहाराचे खंड घातले आहेत. त्यामुळें क्रमशः लिहिलेल्या ऐतिहासिक माहितीचें सूत्र या उपसंहारामुळें सारूपानें संपादकांना मांडतां येईल.

शेवटीं अकराव्या खंडाबद्दल थोडें लिहून विभागणीचें हें विवेचन आम्ही पुरें करतों. भाषा व व्याकरण हे विषय सिद्ध योजनेच्या अकराव्या खंडांत आहेत. त्यांतच कोंकणी, अहिराणी, डांगी इत्यादि लहानमोठ्या पोटभाषांचा प्रश्नहि घेतला जावा असें आम्ही सुचवितों. या भाषांचें भवितव्य काय हा मराठी जनतेच्या दृष्टीनें महत्त्वाचा प्रश्न आहे. त्याची दखल घेऊन त्यावर नीट चर्चा व्हावी व ती सारूपानें या खंडांत यावी असें आम्हांस वाटतें.

योजनेसंबंधींच्या या चर्चेचा समारोप करतांना आम्हांला ही जाणीव आहे कीं, खंडांच्या विभागणीसंबंधीं आम्हीं तपशीलवार विवेचन केलेलें नाहीं. पण प्रारंभ, मध्य व उत्तर या खंडांच्या कालमर्यादा ठरवितांना ज्या घटनांचा आम्हीं विचार केला, त्यांचा यापेक्षां अधिक निर्देश करणेंहि फार विस्ताराचें झालें असतें. म्हणून सिद्ध योजनेंतील खंड-विभाजन इतिहासरचनेच्या दृष्टीनें बरोबर नाहीं आणि त्याऐवजीं ढोबळ मानानें अशी दुसरी विभागणी करणें योग्य होईल, एवढेंच प्रतिपादन आम्ही सध्यां करीत आहोंत. या दुसऱ्या विभागणीबद्दल जेव्हां विस्तारशः चर्चा होईल तेव्हां मग खंडवार आणि तपशीलवार असें विवेचन आम्ही करूं.

## वाङ्मयक्षेत्राचा इतर सामाजिक क्षेत्रांशीं अन्वय

या नव्या विभागणीबद्दल एक असा ग्रह होण्याचा संभव आहे कीं, वाङ्मयीन इतिहासाचा विचार करतांना इतर, म्हणजे राजकीय, सामाजिक व आर्थिक इतिहासाचाच आम्हीं मुख्यतः विचार केला आहे. असा ग्रह होणें साहजिक आहे. कारण, आम्हीं कल्पिलेले कालखंड मराठी लोकांच्या आर्थिक, राजकीय व सामाजिक स्थित्यंतरांशीं जुळणारे आहेत. यावर असाहि एक आक्षेप घेतला जाईल कीं, वाङ्मयेतिहासाच्या आमच्या योजनेमुळें वाङ्मयाच्या चर्चेला गौण स्थान येऊन इतर बाबींचीच चर्चा या इतिहासांत वरचढ होण्याचा धोका आहे. या आक्षेपांत गृहीत धरलेला धोका आम्ही नजरेआड करीत नाहीं. तो धोका आहे, पण तो टाळणें सहज शक्य आहे, या भूमिकेवरून प्रस्तुत आक्षेपाला थोडें विस्तृत उत्तर देणें आम्हांला जरूर वाटतें.

वाङ्मयाचा इतिहास केवळ वाङ्मयसापेक्ष दृष्टीनें लिहिला जावा ही गोष्ट निर्विवाद खरी. परंतु ही










वाङ्मयक्षापेक्षताहि सापेक्षच आहे असें आम्हांला वाटतें. मराठी समाजाच्या अनेकविध प्रयत्नांचा व नवनिर्मितीचा इतिहास ही भूमिका आपण गृहीतच धरली पाहिजे व वाङ्मयनिर्मिति हें त्या इतिहासाचें एक अंग मानलें पाहिजे. वाङ्मयाचें क्षेत्र स्वायत्त आहे. पण तें इतर निर्मितीच्या क्षेत्रांपासून अलग आणि अधांतरीं नाहीं. इतर बाबींना वरचढपणा देण्याचा प्रश्न नाहीं. वरचढपणा तर दूरच राहो, पण इतर बाबींची चर्चा जेथें करावयाची तेथें ती वाङ्मयाच्या केवळ अनुषंगानेंच करावी असा आमचा आग्रह आहे. इतर बाबींचा इतिहास मुख्य धरून वाङ्मयाला केवळ प्रतिबिंबात्मक मानावयाचें व त्याचा इतिहास नुसता समांतर पद्धतीनें लिहावयाचा ही पद्धति आम्हांला चूक वाटते. पण आवश्यक दिसेल त्या ठिकाणीं वाङ्मयाच्या क्षेत्रांतील विकासांचा इतर घटनांनीं अन्वय लावणें हें मात्र वाङ्मयेतिहासांत उचित ठरेल.

मध्ययुगीन काळ व इंग्रजी राजवटीनंतरचा आधुनिक काळ असे ढोबळ दोन विभाग आम्हीं मानले आहेत व सिद्ध योजनेंतहि हेच दोन विभाग अध्याहृत आहेत. याचा अर्थ तरी काय? तर वाङ्मयाची निर्मिति ही जरी अखंडपणें नऊ-दहा शतकें चाललेली होती तरी राजकीय जीवनांत आणि आर्थिक व सामाजिक रचनेंत आमूलाग्र स्थित्यंतर होतांच, वाङ्मयाच्या प्रेरणा व प्रकार यांतहि बदल झाला. मध्ययुगीन कालखंडाचा प्रारंभ हीहि एका प्रबोधनाची नांदी होती. तसाच आधुनिक कालखंडाचा प्रारंभ ही नव्या राष्ट्रवादी आणि व्यक्तिवादी प्रबोधनाची नांदी आहे. सारांश, वाङ्मयबाह्य घटनांचा परिणाम जितका स्वरूपणें वाङ्मयावर दिसत असेल तेवढ्यापुरताच त्यांचा विचार करावा ही गोष्ट मानूनच आम्हीं प्रस्तुत नवी खंड-रचना सुचविली आहे.

शेवटीं, ग्रंथविस्तारासंबंधीं थोडा विचार मांडतों. इतिहासग्रंथाचें संपादन व प्रसिद्धीकरण ही गोष्ट एकदांच मोठ्या प्रमाणावर करावी लागते व पुनः पुन्हां हें काम हातीं घेणें अशक्य असतें. म्हणून ग्रंथाच्या विस्ताराच्या बाबतींत सढळ राहावें आणि त्रोटक व कृपण योजना करूं नये, हें खरें. परंतु मराठी भाषेचा इतिहास संकलनपद्धतीनें न लिहितां जर आम्हीं सुचविलेल्या रचनेप्रमाणें लिहिला, तर २४०० पानांच्या विस्तारांत तो पुरेसा विशद होईल असें आमचें मत आहे. तसा विस्तारच करावयाचा तर पांच किंवा दहा हजार पानेंहि इतिहासाचा प्रपंच पसरवितां येईल. उलट पक्षीं, उद्यां कोणी त्रोटक इतिहास म्हणून दीडशें-अडीचशें पानांतहि साऱ्या बाबींचा समावेश करील. पण हीं एकांतिक टोंकें सोडून दिलीं तर प्रत्येक व्यक्ति, पंथ, प्रकार इत्यादिकांच्या भोंवतीं तयार झालेल्या माहितीची नोंद, संदर्भ, परामर्श व मूल्यमापन—इतकें नीट साधण्यासाठीं २४०० पानांची मर्यादा तोकडीहि पडणार नाहीं व फार विस्ताराची देखील ठरणार नाहीं. सिद्ध योजनेच्या मानानें अर्थातच ही त्रोटक वाटेल. पण तेवढीच ती निर्मितीच्या दृष्टीनें आटोपशीर खर्चाची होईल व मराठी ग्राहकांच्या दृष्टीनेंहि घेण्याला तेवढी सोयीची होईल.

समारोपादाखल आम्ही हेंच मांडूं इच्छितों कीं, सिद्ध योजनेसंबंधीं आम्हीं केलेली टीका व सुचविलेली दुसरी योजना यांचा विचार व्हावा. शक्य तर योजनेच्या फेरविचारासाठीं पुन्हां विचार-विनिमय व्हावा. मराठवाडा साहित्य-परिषद्, विदर्भ साहित्यसंघ व गोमंतक साहित्य-परिषद्—या व अशाच सहकारी साहित्यसंस्थांच्या पुढेंहि योजनेबद्दलचा आराखडा मांडावा. त्या त्या विभागांतील व्यक्तींचें तर सहकार्य हवेंच, पण अशा या अखिल महाराष्ट्राच्या कार्यांत मुंबई राज्याबाहेरील महाराष्ट्र-विभागांच्या साहित्यसंस्थांचें सहकार्य आपण घ्यावयास हवें, असें आम्हांस वाटतें.

---

दररोज शंभरवेळां तरी मी मनांतल्या मनांत स्वतःला बजावीत असतों कीं, 'तुझें आंतर आणि बाह्य जीवन हें इतर ( विद्यमान वा मृत ) माणसांच्या श्रमांवर अवलंबून आहे; म्हणून जें कांहीं तुला मिळालें आहे व मिळत आहे तें त्याच प्रमाणांत तरी परत द्यायचा कसून प्रयत्न करीत रहा'. —आल्बर्ट आइन्स्टाइन








येत्या पुण्यतिथीच्या निमित्तानें पुण्यस्मरण : प्रा. प्र. रा. दामले

# ना. गोपाळ कृष्ण गोखले

कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले आपणांस न्या. रानडे यांचे शिष्य म्हणवीत व गांधीजी गोखले यांस आपले गुरु मानीत. हे उभयपक्षीं संबंध नीट समजून घेतले तर ना. गोखले यांच्या व्यक्तिमत्त्वाची व कार्याची योग्य ओळख पटण्यासारखी आहे. आणखी एका थोर व्यक्तीशीं गोखल्यांचा आलेला विशिष्ट संबंधहि या दृष्टीनें लक्षांत घेण्यासारखा आहे. ती व्यक्ति म्हणजे लो. बाळ गंगाधर टिळक. टिळकांशीं गोखल्यांचे असलेले मतभेद, त्या दोघांचा विशिष्ट पद्धतीनें एकमेकांशीं चाललेला तात्त्विक संग्राम व सार्वजनिक जीवनांतील त्यांतील प्रत्येकाचें असलेलें विशिष्ट स्थान यांबद्दल पुष्कळ लेखन व विवेचन झालेलें आहे. तरी पण अद्यापहि निःपक्षपाती बुद्धीनें त्यांचा विचार होण्यासारखा आहे. वर दिग्दर्शित केल्याप्रमाणें. ना. गोखले यांचे ज्या तीन थोर व्यक्तींशीं संबंध आले, ते संबंध लक्षांत घेऊन, ना. गोखल्यांच्या जीवनाचें व कार्याचें एका विशिष्ट दृष्टिकोनांतून थोडक्यांत पुण्यस्मरण करावें, असें या लेखांत योजिलें आहे.

## सार्वजनिक कार्याची दीक्षा

गोखल्यांचें पुण्यस्मरण हा शब्दप्रयोग मीं बुद्धिपुरःसर योजिला आहे. आपलें चारित्र्य, कर्तबगारी व निःस्वार्थी समाजसेवा यांयोगें ज्यांनीं आपल्या समाजाचें व देशाचें नांव उज्ज्वल केलें अशा अलौकिक व्यक्तींपैकीं ना. गोखले हे होते. त्यांच्या कार्याची व जीवनाची स्मृति ही सत्कार्य व सद्विचार यांस निसंशय प्रोत्साहक आहे. आपल्या ४९ वर्षांच्या अल्पायुष्यांत गोखल्यांनीं त्यांच्यापुढें असलेल्या कामाच्या डोंगराचा इतका मोठा भाग उचलला कीं, त्यांनीं केलेलें कार्य हें एका व्यक्तीकडून कसें होऊं शकलें, याचा अचंबा वाटल्याशिवाय राहत नाहीं. या देशाला त्यांनीं ठेवलेल्या देणग्यांपैकीं एकच--'भारत-सेवक समाज'—जरी मनांत आली, तरीहि कृतज्ञतेनें व आदरानें मन भारावून जातें.

गोखले यांच्या सार्वजनिक जीवनास प्रारंभ विशेषतः टिळकांच्या प्रोत्साहनानें 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी' च्या आद्य संस्थापकांबरोबर त्या संस्थेंत झाला. सुमारें २० वर्षे त्या संस्थेंत त्यांनीं निष्ठेनें व उत्साहानें अध्यापनाचें कार्य केलें. सन १८८५ पासून १९०३ सालीं विस्तृत सार्वजनिक कार्याची दीक्षा घेऊन 'भारत-सेवक-समाजा'ची प्रतिष्ठापना करीपर्यंत, त्यांनीं डे. ए. सोसायटी या संस्थेची निष्ठेनें बहुविध व बहुमोल सेवा केली. 'Farewell to Fergusson College' या आपल्या भाषणांत राष्ट्रसेवेच्या जनशिक्षणाच्या दालनांतून आपण अधिक विस्तृत क्षेत्रांत कां व कसें पडत आहोंत याची अतिशय हृदयंगम मीमांसा गोखले यांनीं केली आहे. गोखल्यांनंतर 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी'-मधून पुष्कळ व्यक्ती निवृत्त झाल्या. परंतु डे. ए. सोसायटींतील सभासदांचा स्वार्थत्याग व राष्ट्रहिताची अभिलाषा या गुणांचा प्रकर्ष ज्यांत शोभून दिसेल, अशा जीवनाचा स्वीकार करण्याकरितां जे निवृत्त झाले असे गोखले एकटेच होत. अद्यापहि त्यांचें तें भाषण वाचलें म्हणजे मन आदरानें भारावून जातें.

## टिळकांची भूमिकाच अधिक योग्य

प्राध्यापक व आजीव सेवक म्हणून गोखल्यांनीं श्रेष्ठ दर्जाचें कार्य केलें व आपल्या मोठेपणामुळें डे. ए. सोसायटी या संस्थेस मोठेपणा प्राप्त करून दिला. 'गोखल्यांचें कॉलेज' म्हणून अनेक लहानमोठे लोक फर्ग्युसन कॉलेजास ओळखीत व त्याबद्दल आपलेपणा दाखवीत. टिळकांच्या व गोखल्यांच्या मतभेदांचा प्रारंभ येथेंच झाला. ते मतभेद दोन प्रकारचे होते. एका मतभेदाचें पर्यवसान पुढें नेमस्त व जहाल पक्षांच्या स्थापनेंत झालें. दुसरा मतभेद संस्थेंतील अंतर्गत कार्यपद्धति व तिचीं तत्त्वें यांबद्दल होता. आतां पन्नास वर्षांनंतर या वादाचें निःपक्षबुद्धीनें निरीक्षण करणें शक्य आहे. तसें तें केल्यास दोन्हीहि पक्षांच्या बाजूनें कांहीं सत्य होतें, पण दोघां-







नींहि आपापले पक्ष वाजवीपेक्षां अधिक आग्रहानें व एकेरीपणानें मांडले होते असें मत होतें. व्यक्तिशः टिळकांच्या मानानें गोखले सौम्य प्रकृतीचे होते. म्हणून झालेल्या वादंगांत कटु शब्दप्रयोग टिळकांच्या-कडून अधिक झाले असावे. शिवाय, टिळकांचे चाहाते व त्यांचा अनुयायिवर्ग हे नेहमींच संख्येनें अधिक व उत्साही होते. त्यांच्यापैकीं कांहींकडून सदभिरुचीचें अनेक वेळां उल्लंघन झालें. उलट, या वादांतील मुख्य तात्त्विक मुद्यांबाबत टिळकांची भूमिकाच अधिक योग्य वाटते. डे. ए. सो. च्या सभासदांनीं किमान वेतनावर संपूर्णतया आपणांस शिक्षणकार्यांत मिशनरी वृत्तीनें वाहून घेतलें पाहिजे व तसें झाल्यास सोसायटीचें शिक्षणकार्य पुष्कळ प्रकारें सुधारतां व वाढवितां येईल हें टिळकांचें म्हणणें निर्विवाद सत्य आहे. महाराष्ट्रीय शिक्षण-संस्थांकडून संशोधनाचें व उच्च शिक्षणाचा दर्जा वाढविण्याचें कार्य तितकें यशस्वी रीतीनें झालें नाहीं याचें एक कारण, या वादांत डे. ए. सो. च्या नियामक-मंडळानें या वेळीं टिळकांवरील रागामुळें घेतलेला चुकीचा तात्त्विक निर्णय हें होय. त्या वेळीं आपल्या देशाच्या विशिष्ट परिस्थितींत सार्वजनिक कार्यकर्ते थोडे होते. त्यामुळें मूळ शिक्षणकार्यांत भाग घेत असलेले टिळक, आगरकर, गोखले यांच्यासारख्या व्यक्तींनीं सार्वजनिक जीवनाच्या दुसऱ्याहि विभागांत कार्य करावें असें त्यांना स्वतःस व जनतेस वाटणें साहजिक होतें. परंतु तें करण्याचा योग्य मार्ग म्हणजे शिक्षणक्षेत्रांतून निवृत्त होऊन विस्तृत सार्वजनिक कार्याचा अंगीकार करणें हा होय. टिळक मत-भेदांमुळें डे. ए. सोसायटीमधून बाहेर पडले व गोखले स्वखुषीनें बाहेर गेले. परंतु दोघांसहि सार्वजनिक कार्यांत पुढाकार घेण्यापूर्वी शिक्षणक्षेत्र सोडावें लागलें. त्याचें कारण स्पष्ट आहे. तें असें कीं, राजकारण व शिक्षण-संशोधन हीं दोन्हींहि पूर्ण वेळ व शक्ति देण्याचीं कामें झालीं आहेत व तीं तशींच केलीं गेलीं तरच त्यांस तेजस्विता प्राप्त होते. लहान-मोठीं पाठ्यपुस्तकें तयार करणें आणि लिहिणें व सरकारचा विशेष रोष होणार नाहीं अशा प्रकारें सार्वजनिक, सामाजिक, आर्थिक व राजकीय क्षेत्रांत कार्य करणें या गोष्टी आगरकर, गोखले व आपटे करीत होते तोंपर्यंत त्या प्रत्यक्ष अनिष्ट नव्हत्या. परंतु तत्त्वतः त्यामुळें उच्च शिक्षणसंशोधनाच्या कार्यांत व्यग्रता येते, हें नाकबूल करतां येणार नाहीं. समाजकारण व राजकारण या क्षेत्रांतील टिळकांचीं मतें व त्यांचे मार्ग बरोबर आहेत कीं नाहींत याबद्दल मतभेद असूं शकेल. कदाचित् गोखले, आगरकर यांचें राजकारण व समाजकारण टिळकांस पसंत असतें तर त्यांच्यांतील मतभेद इतका विकोपास गेला नसता. परंतु टिळकांच्या डे. ए. सो. च्या राजीनाम्यांत मुख्यतः वर दर्शविलेला जो तात्त्विक मुद्दा मांडला गेला आहे त्याचें उत्तर टिळकांच्या बाजूनेंच देणें योग्य आहे, हें प्रत्यक्ष गोखल्यांनीं स्वतः राष्ट्रकार्याचा प्रारंभ करण्यापूर्वी स्वखुषीनें फर्ग्युसन कॉलेज सोडल यावरून व गोखल्यांनंतर डे. ए. सोसायटींतील ज्या अनेक प्राध्यापकांनीं शिक्षणेतर कार्य केलें त्याच्या दुष्परिणामांवरून लक्षांत येतें. गोखल्यांच्या व्यक्तिमत्त्वानें व कार्यानें प्रभावित होऊन त्यांच्याबद्दल गाढ आदर असणाऱ्या अनेक प्राध्या-पकांनीं गोखल्यांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला. पण तो अर्धवटच होता. गोखल्यांच्या उदा-हरणाचें त्यांनीं जर पूर्णपणें अनुकरण केलें असतें तर गोखल्यांविषयीं त्यांना असलेला आदर अधिक सफल झाला असता. गोखले याबाबत टिळकांशीं भांडले असले तरी प्रत्यक्ष आचरणानें त्यांनीं टिळकांचीच भूमिका पत्करली. भारतीय राजकारणांतून महा-राष्ट्राचें स्थान हळू हळू कमी होण्यास जीं अनेक कारणें झालीं, त्यांपैकीं एक मुख्य कारण वरील घटनेंत आहे. त्यामुळें पहिल्या प्रतीचा स्वार्थत्याग व चारित्र्य असलेल्या कार्यकर्त्यांची गोखले-टिळक यांच्यानंतर आपल्या सार्वजनिक कार्यांत वाण पडली.

टिळक व गोखले यांच्या सार्वजनिक कार्य-पद्धतीची याच ओघांत थोडक्यांत चर्चा केल्यास गोखल्यांची मनोवृत्ति व दृष्टिकोन सुलभतेनें समजून येईल. पहिली महत्त्वाची गोष्ट अशी कीं, गोखले रानडे यांचे शिष्य असले, तरी आपल्या सार्वजनिक कार्याची कक्षा त्यांनीं टिळकांसारखीच राजकीय क्षेत्रापुरती मर्यादित केली. रानड्यांची बुद्धिमत्ता सर्वंकष व सहृदयता सर्वस्पर्शी होती. त्यामुळें रानड्यांनीं महाराष्ट्रीय व भारतीय सार्वजनिक








जीवनाच्या सर्व क्षेत्रांत विशिष्ट पद्धतीनें कार्य केलें. परंतु हेंहि खरें कीं एका अर्थी त्यामुळें रानड्यांच्या कार्यास धार व तीव्रता आली नाहीं व वैचारिक जागृति निर्माण करण्यापलीकडे त्याची प्रगति झाली नाहीं. आगरकर व गोखले यांना परस्पर व्यक्तिशः आदर असला तरी सामाजिक प्रगति अधिक महत्त्वाची कीं राजकीय प्रगति अधिक महत्त्वाची या प्रश्नानें आगरकरांप्रमाणें 'सामाजिक' असें उत्तर गोखले यांनीं दिलें नाहीं. इतकेंच नव्हे तर, आगरकरांची बुद्धीवर अधिष्ठित अशीं सामाजिक व धार्मिक विषयांवरील मतें गोखल्यांस संमत नव्हतीं व तीं त्यांना परवडलीं नसतीं, असें साधार म्हणतां येईल.

### भावनाधिष्ठित राजकारण

गोखले व टिळक यांना राजकीय प्रगतीकरितां ज्या भिन्न पद्धती स्वीकाराव्या लागल्या त्या आज खरोखर ऐतिहासिक स्वरूपाच्या झाल्या आहेत. इतकेंच नव्हे तर, गांधीजींची कार्यपद्धति लक्षांत घेतां टिळक व गोखले यांच्या कार्यपद्धतींतील भेदापेक्षां त्यांच्यांतील साम्यच अनेकांस अधिक महत्त्वाचें वाटूं लागलें आहे. टिळकांचे कांहीं अनुयायी असें समजतात कीं, टिळकांच्या मार्गाचीच परिणति गांधीजींच्या चळवळींत झाली. उलट असेंहि म्हटलें जातें कीं, १९१४ नंतर म्हणजे आपल्या परिणत अवस्थेंत, टिळकांनीं जहाल राजकारण सोडून प्रतियोगी सहकाराचें तत्त्व मान्य करून गोखलेप्रभृति नेमस्तांच्या राजकारणाचा स्वीकार केला. स्वतः गांधीजी आपणांस गोखल्यांचे शिष्य मानीत. या त्यांच्या मानण्यास वैयक्तिक आदराचें व स्नेहपूर्ण परिचयाचें दर्शन यापेक्षां अधिक महत्त्व दिलें जात नाहीं. उलट, प्रस्तुत लेखकाच्या मतें, गोखले व गांधीजी यांच्या कार्यपद्धतींत महत्त्वाचें साम्य आहे. तें असें कीं, दोघींचेंहि मुख्य अधिष्ठान भावना हें आहे. महाराष्ट्रीय जीवनाची पार्श्वभूमि व रानड्यांसारख्या बुद्धिमान् नेत्याचें मार्गदर्शन यांमुळें गोखल्यांचें राजकारण भावनाधिष्ठित आहे हें चटकन् लक्षांत येत नाहीं. परंतु मूलतः तें तसें आहे. गांधीजींची १९१९ पर्यंतची राजकारणांतील भूमिका व पद्धति लक्षांत घेतली, तर त्यांसहि गोखल्यांसारखें सौम्य राजकारण करतां येत असे हें स्पष्ट दिसेल. इतकेंच नव्हे तर त्यांच्या सत्याग्रही चळवळीचाहि इतिहास नीट अवलोकिला तर बुद्धिवादापेक्षां भावनेची कसोटी ते अनेक व्यावहारिक घटनांस लावीत, असें कबूल करावें लागेल. म्हणून गोखल्यांच्या काळांत गांधीजी त्यांजसारखेच वागते—व वागले. त्याप्रमाणेंच गांधीजींच्या अमदानींत गोखले असते तर तेंहि त्यांच्या अलीकडील अनुयायांच्या कल्पनेपेक्षां फार वेगळे वागते असा संभव आहे. याच्या उलट टिळक प्रकृतीनें व स्वशिक्षणानें विचारवंत व बुद्धिप्रधान होते. त्यांनीं ब्रिटिशांशीं गांधीजींच्याप्रमाणें कधींहि पूर्ण असहकार केला नसता व गोखले व गांधीजी यांप्रमाणें त्यांच्यावर त्यांनीं कधीं विश्वासहि ठेवला नसता. मनुष्यस्वभाव व आन्तरराष्ट्रीय परिस्थिति यांच्या निरीक्षणानें त्यांनीं देशाच्या परिस्थितीबद्दलचीं आपलीं मतें ठाम बनविलीं होतीं व कर्मयोग्याच्या विरक्तीनें, हर्षशोकांचे उद्रेक न होऊं देतां, त्यांनीं आपलें राजकारण चालविलें असतें. प्रतियोगी सहकाऱ्याची भूमिका प्रेमाचीहि नाहीं व द्वेषाचीहि नाहीं व ती टिळकांची सदैव होती. टिळकांचें वैयक्तिक चारित्र्य, धैर्य व स्वार्थत्याग यांमुळें जनतेच्या मनावर त्यांचा पगडा बसला. परंतु सामान्य जनतेच्या प्रकृतीस मानवणारें भावनात्मक राजकारण (—जें नेहमींच योग्य नव्हे—) टिळक खेळले असते असें वाटत नाहीं. गांधीजी व टिळक यांत निवड करावयाची वेळ आली असती तर भावनाप्रिय सामान्य व्यक्तींनीं गांधीजींचीच निवड केली असती असें वाटतें. योगायोगानें ती वेळ आलीच नाहीं. कारण गांधीजींच्या अमदानीच्या प्रारंभींच टिळक स्वर्गवासी झाले. ब्रिटिश लोकांच्या सौजन्यावर विश्वास ठेवून राजकारण जितकें व जसें लढवितां येणें शक्य होतें तितकें गोखले यांनीं लढविलें. तो विश्वास उडाल्यावर तें गांधींनीं पुढें चालविलें. रानड्यांच्या व टिळकांच्या राजकारणांतील कार्यपद्धतीपेक्षां गोखले व गांधी यांची कार्यपद्धति वेगळी होती. रानड्यांपेक्षां गोखले व टिळकांपेक्षां गांधी एका विवक्षित अर्थी प्रभावी ठरले.

### गांधी आणि गोखले यांच्यांतील साधर्म्य

गोखल्यांच्या निष्कपट भावनात्मकतेचें एक महत्त्वा-








चें उदाहरण म्हणजे त्यांचें सुप्रसिद्ध माफी-प्रकरण हें होय. सार्वजनिक जीवनांतील मोठमोठ्या चुकांची सार्वजनिक कबुली, त्या चुकांबद्दल प्रायश्चित्त—या गोष्टींस, पुढें गांधीजींच्या अमदानींत त्यांचें विशिष्ट व्यक्तित्व व वेगळी राजकीय परिस्थिति यांमुळें, प्रभावी राजकीय घटनांचें स्वरूप आलें. गोखले यांनीं माफी मागितली त्यामुळें त्यांवर त्या वेळीं केवढा गहजब झाला! आपल्या भावनाधिष्ठित जीवनाच्या परिमाणानें जग मोजण्याचें गांधींचें कौशल्य व आत्यंतिक निष्ठा गोखल्यांच्या जवळ नसल्यानें, अगदीं थोडे विचारी लोक सोडले तर इतर सर्वांनीं गोखल्यांस या प्रकरणीं थोडाबहुत दोषच दिला व खुद्द गोखल्यांसहि खिन्नता आली. अशा प्रसंगीं टिळकांनीं माफी मागितली नसती, रानड्यांनीं आपल्यावर असा प्रसंग येऊं दिला नसता, गांधींनीं माफी मागण्यानेंच आपला लौकिक वाढविला असता. टिळक व गोखले यांच्या दरम्यान जे वाद झाले व ज्यांतील शेवटला तर गोखल्यांच्या निधनाच्या आधीं थोडे दिवस झाला, त्यांतूनहि एका निराळ्या अर्थी गोखल्यांची भावनावशता दृष्टोत्पत्तीस येते. मतभेद असणारे दोन पक्षप्रमुख एकमेकांबद्दल जे शब्दप्रयोग करतात व सार्वजनिक रीत्या पक्षाच्या यशाकरितां जे डावपेंच परस्परांविरुद्ध लढवितात, ते शब्दशः घ्यावयाचे नसतात. अशा डावपेंचांतील बरेवाईटपणानें आपलें मन दुखूं देणें व दुसऱ्याबद्दल मत कलुषित होऊं देणें, हें बुद्धिनिष्ठ राजकीय कार्यकर्ता करणार नाहीं. गोखले बुद्धिमान् होते व निष्कपट होते. परंतु स्वभावानें बुद्धिनिष्ठ व वृत्तीनें विचारशील नसल्यानें कांहीं प्रसंगीं त्यांस निष्कारण त्रास होई. गांधीजींच्या जीवनांतहि असे कांहीं परंतु थोडे प्रसंग आहेत. एक लक्षांत येण्यासारखा प्रसंग श्रीमती कस्तुरबा यांच्या निधनाच्या वेळचा. त्या वेळीं गांधीजींनीं केलेल्या तक्रारी भावनावश पुढाऱ्याला शोभतात. परंतु देशसेवेचें कंकण बांधून सर्वसुखत्याग करणाऱ्या त्यांच्यासारख्या फकिराला नव्हे. परंतु भावनात्मकता हाच एका अर्थी गांधींच्याच नव्हे तर गोखल्यांच्याहि निष्ठेचा, असामान्य कर्तबगारीचा व यशाचा पाया होय. त्यामुळेंच देशसेवेच्या भावनेनें परिपूर्ण असें गोखल्यांचें व्यक्तिमत्त्व प्रभावी व अतुल रीतीनें कार्यक्षम झालें.

गांधीजी 'भारत-सेवक-समाजा'चे सभासद होऊं इच्छीत होते. गोखल्यांचीहि तशी इच्छा होती. परंतु अधिक विचाराअंतीं '-समाजा'च्या सभासदांनीं त्याबाबत नाखुषी दर्शविली असें ऐकण्यांत येतें. ही घटना गोखले व गांधी यांचे संबंध व साधर्म्य यांवर प्रकाश टाकणारी आहे. टिळक व गोखले या दोघांनींहि प्रथमपासून गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाचें व त्यांच्या निष्ठेचें बळ ओळखलें होतें. गांधीजींचा टिळकांपेक्षां गोखल्यांशीं अधिक संबंध आला. या वेळीं एका अर्थी, "नेहमींच सौम्य उपायावर विश्वास असणारी, लोकसेवेचें व्रत अंगीकारिलेली सौजन्ययुक्त पण करारी अशी ही आपणांसारखीच एक व्यक्ति आहे आणि म्हणून ज्या ध्येयानें प्रेरित होऊन आपण देशकल्याणाच्या ऐहिक ध्येयाच्या पूर्तीकरितां 'भारत-सेवक-समाज' ही मिशनरी संस्था स्थापिली, तिचा सदस्य होण्यास ही व्यक्ति विशेष योग्य आहे" असें गांधीजींविषयीं गोखल्यांस वाटलें असावें. परंतु रानडे यांच्या छत्राखालीं वाढलेल्या गोखल्यांच्या देशसेवेची पद्धति मूळ भावनानिष्ठ असली तरी, शिक्षणानें व उदाहरणानें ती व्यवहारी झाली होती. उलट, गांधीजींच्या वृत्तींत त्या काळींहि असहकाराचे स्फुलिंग होतेच व अन्यायाशीं सारखा लढा करण्याची टिळकांची झुंझारवृत्तीहि होती. गांधींचें गोखल्यांशीं साधर्म्य होतें हें खरें असलें, तरी गोखल्यांचें अनुयायित्व करण्याइतकें त्यांच्याशीं तद्रूपत्व नव्हतें. 'भारत-सेवक-समाजा'सारख्या फकिरी बाण्याच्या लोकसेवेच्या सत्याग्रह-आश्रमादि संस्था पुढें गांधीजींनीं काढल्या व चालविल्या. तोच त्यांच्या व 'भारत-सेवक-समाजा'मधील दुवा होता. प्रत्यक्ष गांधीजी 'भारत-सेवक-समाजा'चे सदस्य झाले असतेच तर त्या समाजाचें स्वरूप इतकें बदललें असतें कीं, कदाचित् नांवाशिवाय त्यांत फारसें साम्य राहिलें नसतें!

आपल्या आयुष्यांतील सुमारें २० वर्षें आपल्या कर्तबगारीनें एका शिक्षणसंस्थेस उज्ज्वल केल्यावर, नंतरच्या १०-१२ वर्षांत गोखल्यांनीं दोन जन्मांस








पुरून उरेल इतकी कामगिरी केली ! त्यांच्या प्रामाणिक भावनेचा अल्पांशहि आपण हिंदी लोकांनीं अंगीं बाणविला तर आपणांपुढें असलेले बिकट प्रश्न सुटण्याच्या मार्गावर येतील. देशसेवा करावयाची तर देशाच्या गरजा काय आहेत या नीट समजून घेऊन, निरलसपणें त्यांच्या निवारणाची योजना आंखणें व त्या अंमलांत आणणें अवश्य आहे. स्वराज्याचे अगदीं थोडे हक्क हिंदी जनतेकडे असतांना अभ्यास, सहकार्य, सामोपचारवृत्ति, विचारविनिमय यांच्यायोगें अधिकांत अधिक कार्य गोखल्यांनीं केलें. आज आपण म्हणूं तसें वळूं शकण्याचे दिवस आले आहेत. म्हणूनच गोखल्यांसारखे खरे देशहिततत्पर कार्यकर्ते हवे आहेत.

गोखल्यांचें 'सौम्य वैद्यक'

आज गोखले असते तर त्यांनीं काय केलें असतें या वर सुचविलेल्या प्रश्नाचा विचार करणें उद्बोधक होईल. अगदीं लहान मोहरीपासून सुरुवात करावयाची झाल्यास, गोखले आज जर असते तर पुण्यांतील 'सर्व्हंट ऑफ इंडिया' व 'ज्ञानप्रकाश' हीं प्रागतिक वृत्तपत्रें बंद झालीं नसतीं, 'लिबरल फेडरेशन'च्या वार्षिक सभा स्थगित झाल्या नसत्या व स्वतंत्र भारतांतील पहिल्या सार्वत्रिक निवडणुकींत प्रागतिक पक्ष देशांत नाहींच असें वाटण्यासारखी स्थिति आली नसती. देशाच्या राजकीय पक्षांतून प्रागतिकांचें स्थान नाहींसें होण्यास इतर कारणें असलीं तरी त्यांतील मुख्य कारण त्या पक्षानें गोखल्यांच्यानंतर स्वार्थ-त्याग व फकीरी वृत्ति यांची जोपासना केली नाहीं हेंच होय. गोखल्यांवरील मृत्युलेखांत, 'देशांतील दैन्यावस्थेचें अचूक निदान करून निरलसपणें व निरपेक्षतेनें त्यावर सतत उपाय करणारा, पण सौम्य उपायावर विश्वास असणारा भिषग्वर्य' असें टिळकांनीं गोखल्यांचें वर्णन केलें होतें. गोखल्यांचे अनुयायी म्हणविणाऱ्यांनीं लहानसहान बाबतींतहि गोखल्यांची उद्योगनिष्ठा व चिकाटी दाखविली नाहीं म्हणून देशास अत्यंत जरूर असलेलें हें 'सौम्य वैद्यक' नाहींसें होण्याच्या पंथास आलें आहे. फावल्या वेळांत, नोकरी-धंदा व कौटुंबिक स्वास्थ्य यांस धोका न लागेल अशा प्रकारें धीरोदात्तपणाचा आव आणून देशापुढील प्रश्नांवर मतप्रदर्शन करणें एवढ्यानें प्रागतिक म्हणून आपलें कर्तव्य संपलें, अशी समजूत फैलावली. ऐहिक ध्येयाकरितां मिशनरी वृत्तीनें वाहून घेतलेल्या संस्था काढण्याचा गोखल्यांचा मनोदय सफल झाला नाहीं. कॉंग्रेसमधील उजव्या पक्षाच्या प्रामाणिक कार्यकर्त्यांनीं किंवा त्यांच्या सहकार्यानें हाताच्या बोटांवर मोजतां येण्याजोग्या खऱ्या प्रागतिकांनीं फार जोमानें प्रयत्न केला तर कदाचित् प्रागतिक मतप्रणाली पुनः जीव धरील. पण तसा आज फारसा संभव दिसत नाहीं.

गोखल्यांचा व त्याहिपेक्षां रानड्यांचा प्रागतिक दृष्टिकोन हा या देशास आज व सदैव लाभकारक होणार आहे. विधायक वृत्ति, संयम, विवेकशीलता हीं खऱ्या प्रागतिक वृत्तीचीं मुख्य लक्षणें होत. महाराष्ट्रीय नेत्यांमध्यें न्या. रानडे यांच्या जीवनांत अशा प्रागतिक वृत्तीची सर्वोत्कृष्ट प्रचीति येते. परंतु तिच्या प्रत्यक्ष फैलावाकरितां व्यावहारिक संघटना गोखल्यांनीं निर्माण केल्या व प्रत्यक्ष कार्य केलें. गोखल्यांच्या ह्या संघटना गोखल्यांच्या धडाडीनें चालविल्या असत्या तर स्वराज्यप्राप्तीनंतर आपलीं जीं अनेक व्यंगें दृष्टोत्पत्तीस आलीं तीं आपण बहुतांशीं दूर करूं शकलों असतों.

गोखले व टिळक यांचे मतभेद प्रसिद्ध आहेत. परंतु त्यांस एकमेकांबद्दल असलेला आदर तितकासा प्रसिद्ध नाहीं. परंतु टिळकांनीं गोखल्यांवरील मृत्युलेखांत त्यांच्या थोरपणाची जी मीमांसा फार मार्मिकपणें केली आहे ती आजहि समर्पक आहे असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. त्यांतील एका अवतरणानें हें पुण्यस्मरण पुरें करतों—"धामदौलास न भुलतां आपण एकटेच निर्धन जन्मलों, तसे एकटेच जाणार हें लक्षांत आणून, ऐहिक सुखाचा त्याग करणें आणि केवळ देशहितकारक धर्म आचरणें यांतच खरा थोरपणा आहे आणि हा धर्म ज्यानें कडक रीतीनें पाळला तो दुसरें कांहीं करो वा न करो, त्यानें योजिलेले उपाय सौम्य असोत वा कडक असोत, केवळ वरील धर्म पाळल्यामुळेंच तो देशकर्त्या पुरुषांच्या वर्गांत पडून सद्गति पावतो."

---








पंचवार्षिक योजनेसंबंधीं कांहीं अर्थशास्त्रज्ञांचे विचार : प्रा. भा. शं. भणगे

# त्रिवेन्द्रम् येथील अर्थशास्त्र-परिषदा

गेल्या डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत त्रिवेंद्रम् येथें अर्थज्ञांच्या दोन परिषदा झाल्या : अखिलभारतीय अर्थशास्त्र-परिषद् आणि अखिलभारतीय शेतकी-अर्थशास्त्र-परिषद्. सबंध देशांतून अर्थशास्त्राचे अनेक प्राध्यापक, सरकारी अर्थखात्यांतले अधिकारी आणि कांहीं धंद्यांमधील संस्थांचे प्रतिनिधी जमले होते. तेथें जीं व्याख्यानें आणि चर्चा झाल्या त्यांमधून अर्थ-योजनेसंबंधीं, विशेषतः भारताच्या पंचवार्षिक योजनेसंबंधीं, जे मतप्रवाह दिसले त्यांचा संक्षिप्त परामर्श पुढें दिला आहे.

## नियोजनामागील भूमिका

एखाद्या देशाची योजना म्हटली म्हणजे तींत कांहीं उद्दिष्टें ठरवून, त्या उद्दिष्टांची क्रमवारी लावून, देशाचीं अर्थसाधनें त्या उद्दिष्टांसाठीं योजणें ह्या गोष्टी आल्याच. उलट, अर्थव्यवस्था योजनाबद्ध नसतांना प्रत्येक व्यक्ति आपल्या मता-प्रमाणें वरील सर्व गोष्टी ठरवीत असते. समजा, शेतीचें उत्पादन वाढवावयाचें असलें तर गिऱ्हाईकांनीं त्यासाठीं स्वतः मागणी केली पाहिजे, शेतकऱ्यांनीं स्वतः उत्पादन वाढवावयाचें ठरविलें पाहिजे, त्यांनीं स्वतः योग्य वाटेल त्या मार्गांनीं खर्चासाठीं पैसा गोळा केला पाहिजे. उलट पक्षीं, योजनेंत योजनाकार सर्व उद्दिष्टें ठरवितात. अर्थ-शास्त्रांत अशीं उद्दिष्टें ठरवितां येत नाहींत, असा एक आक्षेप घेतला जातो. कारण अशीं उद्दिष्टें योजनाकारांनीं ठरविलीं तर व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर आक्रमण होतें. यावर असेंहि उत्तरादाखल म्हणतां येईल कीं, एरव्हींसुद्धां व्यक्तीला हें स्वातंत्र्य नाहीं. मूठभर मक्तेदार लोकांना फक्त हें स्वातंत्र्य मिळतें. अर्थशास्त्रज्ञ म्हणून योजनाकाराला उद्दिष्टें ठरवितां येणार नाहींत हें खरें. पण बहुजनसमाजाला ज्या गोष्टी बऱ्या-वाईट वाटतात त्याप्रमाणें तो उद्दिष्टें मांडूं शकेल. योजनेंतील उद्दिष्टें अशा रीतीनें समाजानें ठरविलेलीं असतात.

" अर्थयोजनेंतील दृष्टि एकांगी आणि अपुरी असते. अर्थयोजना केवळ आर्थिक सुधारणेसाठीं असते. पण जीवन केवळ आर्थिक नाहीं. माणसाची आर्थिक सुधारणा करणें म्हणजे माणूस सुधारला, असें समजतां यायचें नाहीं. किंबहुना, योजनेंत जे उपाय दिलेले असतात त्यांनीं आर्थिक बाजू सुधारली तरी दुसऱ्या एखाद्या दिशेनें माणसाची अधोगति होईल. योजनेंत सबंध जीवनाचा, एवढेंच नव्हे तर जीवना-च्या अंतिम उद्दिष्टाचा साकल्यानें विचार केला पाहिजे " असें प्रा. पी. ए. वाडिया यांनीं सांगितलें आहे. दूरवर विचार केल्यावर नजिकच्या भविष्यकाळांत अपयश आलें तरी निराश होण्याचें कारण नाहीं. मानवाच्या उत्क्रांतींत असंख्य अपयशें येऊन गेलीं. पण मानव आपलें उद्दिष्ट शोधीत चाललाच आहे. योजनाकारांना ही दृष्टि असली पाहिजे, असें सांगून प्रा. वाडिया पुढें म्हणाले :

" ज्यांना समाजांत बदल घडवून आणावयाचा आहे, अशा योजनाकारांची दृष्टि केवळ एंजिनिअर्स-सारखी असून उपयोगी नाहीं. त्या योजनाकारांची दृष्टि ध्येयदर्शी कलावंताप्रमाणें असली पाहिजे. केवळ संकुचित वर्तमानकाळांतच अडकून न राहतां, वर्तमानकाळाच्या पलीकडे झेंप घेणाऱ्या जीवनाच्या विशाल विकासशक्तींची जाणीव त्यांना असली पाहिजे. आमचे योजनाकार असे असले पाहिजेत कीं, ज्यांना जीवनाविषयीं आदरभाव आहे, आतांपर्यंत-च्या मानव-जीवनाच्या ऐतिहासिक मंथनांतून वर आलेल्या मानवी मूल्यांचें ज्यांना दर्शन घडलें आहे आणि त्या मूल्यांनुसार जे वर्तमानकालीन उद्दिष्टांना एका विशिष्ट प्रेममूलक श्रद्धेनें कलाटणी देऊं शकतात. "

योजनेमागील दुसऱ्याहि एका मूलभूत दोषाकडे वाडियांनीं लक्ष वेधलें. योजनेमध्यें व्यक्तींना सारखें मानलें जातें. व्यक्तींच्या गरजांमध्यें सारखे-पणा मानला जातो. व्यक्तींना एकाच प्रकारच्या जीवनक्रमाचा लाभ करून द्यावयाचा असतो. आरंभीं म्हटल्याप्रमाणें यामुळें व्यक्तींचें स्वातंत्र्य








नष्ट होतें एवढेंच नव्हे तर सांचेबंदपणा (standardisation) चा हा दुसरा दोष उद्भवतो. एकंदरींत अलीकडे सर्व शास्त्रांची प्रवृत्तीच सांचेबंदपणाकडे झुकली आहे. योजनेच्या कल्पनेनें ती प्रवृत्ति बळावतेच आहे. कारण योजना यशस्वी करायची झाली तर सांचेबंदपणा उपकारक ठरतो.—प्रस्तुत लेखकाच्या मतें हा सांचेबंदपणा सकृद्दर्शनीं वाटतो तेवढा मोठा दोष नव्हे. कांहीं मर्यादेपर्यंत सर्व व्यक्तींना सारख्या मानावयास हरकत नसावी. उदाहरणार्थ, माणसांच्या प्राथमिक गरजा सारख्याच नाहींत का? ज्या योजनेंत माणसांच्या निदान किमान गरजा भागविण्याची तरतूद करावयाची असते त्यांत माणसांना समान लेखलें तर तें फारसें दोषास्पद आहे असें नव्हे.

योजनेचें यश बरेचसें देशाच्या सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीवर अवलंबून असतें. नागरिक प्रबुद्ध असला पाहिजे. योजनेचें उद्दिष्ट त्याला पूर्णतया आकलन करतां आलें पाहिजे. ती योजना स्वतःची आहे असें समजून, ती यशस्वी करण्याचा निर्धार करून, त्यानें उत्साहानें सरकारला सहकार्य दिलें पाहिजे. नागरिकांना ही सामाजिक कर्तव्याची जाणीव तीव्रतेनें असणें आवश्यक होय. ह्या जाणिवेस सामाजिक 'नीतिमत्ता' असेंहि व्यापक अर्थानें म्हणावयास हरकत नाहीं. आर्थिक परिस्थितीमध्यें भांडवलाची उपलब्धता, धंद्यांतील साहस आणि मजुरांचें कसब आणि कार्यक्षमता ह्यांचा अंतर्भाव होतो. इंग्लंडसारख्या देशांत ही सामाजिक-आर्थिक परिस्थिति बऱ्याच प्रमाणांत असल्याचें आणि भारतासारख्या देशांत अल्प प्रमाणांत असल्याचें दिसून येतें. वाडियांनीं ह्या कटु सत्याचा निर्देश केला. परंतु भारतांतील ही शोचनीय परिस्थिति कांहीं अंशीं सरंजामशाहीचें उर्वरित चिन्ह आणि कांहीं अंशीं दारिद्र्याचा परिणाम आहे हें नको का सांगायला! हीं कारणें बरोबर असलीं तर पंचवार्षिक योजनेसारख्या योजनांनींच तीं दूर होत जातील आणि प्रत्येक योजनेला यशाची अधिक अनुकूलता प्राप्त होईल हें लक्षांत येईल. ह्या देशांतील प्रतिकूल परिस्थितींत केंद्रसरकार आणि घटक-राज्यसरकारें ह्यांमधील सहकार्याच्या अभावाचा वाडियांनीं जो उल्लेख केला तो मात्र वेगळ्या स्वरूपाचा आहे. राज्यसरकारांतील कांहीं मंत्र्यांचा विक्षिप्तपणा, हट्टीपणा आणि केंद्रसरकारचा कमकुवतपणा हींच त्याला कारणीभूत होत. केंद्रसरकारनें मनांत आणलें तर ही परिस्थिति सहज बदलतां येईल.

वाडियांना असेंहि वाटतें कीं, योजनेच्या अंमलबजावणींत सरकारची हुकूमशाही आणि सरकारनें केलेलें नागरिकांचें 'लष्करीकरण' (regimentation) हीं अटळ आहेत. त्यांच्या एका पुस्तकांतहि असेंच प्रतिपादन येऊन गेलें आहे. योजना यशस्वी करण्यासाठीं नागरिकांस, लहान मुलांस आणि विद्यार्थ्यांस, विशिष्ट रीतीनें शिकवावें लागतें! योजना म्हणजेच व्यक्तीच्या स्वातंत्र्यावरील घाला, अशी वाडियांची मूळ कल्पना असल्यामुळें, सरकारवर हुकूमशाहीचा आरोप त्यांनीं करणें एका दृष्टीनें साहजिक आहे. परंतु योजना लोकमतावर आधारलेली असली, योजनेला लोकांचें उत्स्फूर्त सहकार्य मिळत असलें, तर 'लष्करीकरणा'ची गरज उरत नाहीं.

योजना यशस्वी करण्यासाठीं सर्व प्रयत्नांची शिकस्त करून, 'करूं किंवा मरूं' असें सर्वस्व पणाला लावून युद्ध लढावें त्याप्रमाणें तिचा पाठपुरावा करावा लागतो. युद्धांतील विजयावर राष्ट्राचें भवितव्य अवलंबून असतें तसें योजनेच्या यशावर राष्ट्राची आर्थिक भरभराट अवलंबून असते. युद्ध लढतांना सर्व पक्षांचें सहकार्य लागतें त्याप्रमाणेंच योजनेलाहि संपूर्ण सहकार्य हवें. युद्धाला मदत करणें नागरिकांचें कायदेशीर कर्तव्य मानतात आणि युद्धाला विरोध करणें गुन्हा मानतात. तसेंच योजनेच्या बाबतींतहि मानलें जातें. ही प्रवृत्ति कम्युनिझमची आहे, धोक्याची आहे, असें सर रामस्वामी मुदलियार यांनीं प्रतिपादन केलें. युद्ध आणि योजना ह्यांमधील साधर्म्य मान्य केलें तरी योजनेवरील हा कम्युनिझमचा आरोप लागू होत नाहीं. युद्धाच्या बाबतींत कर्तव्य आणि गुन्हा यांच्या ज्या व्याख्या आहेत त्या केवळ कम्युनिस्ट देशांतच नसून सर्व देशांत आहेत.—लोकशाही देशांत योजना यशस्वी होईल कीं नाहीं याबद्दल पुष्कळदां शंका व्यक्त करण्यांत येते,








पुण्याचे प्रा. ड्रायव्हर ह्यांनीं अशी शंका घेतलीहि होती. लोकशाही म्हणजे सरकारनें केलेल्या कोणत्याहि गोष्टीस विरोध करण्याचा अधिकार एवढीच कल्पना असेल, तर ती शंका खरी आहे. किंबहुना अशा लोकशाहींत सरकारपक्षाच्या योजनेचा फज्जा उडविणें हें विरोधी पक्षाचें पक्ष म्हणून कर्तव्य मानावें लागेल. जितक्या प्रमाणांत योजनेचा बोजवारा उडेल तितक्या प्रमाणांत विरोधी पक्षाला सरकार बनविण्याची जास्त शक्यता निर्माण होते. पण लोकशाही म्हणजे सर्वांच्या चर्चेनंतर बहुमतानें निर्णय घेऊन ते निर्णय अल्पमतवाल्यांवरहि बंधनकारक समजून केलेलें राज्य असें मानलें, तर मुदलियार यांचा आक्षेप आणि ड्रायव्हर यांची शंका अस्थानीं ठरतात.

### शेतीचा कार्यक्रम

'शेतकी-अर्थशास्त्रपरिषदे'त पंचवार्षिक योजनेंतील शेतीच्या कार्यक्रमावर चर्चा झाली. प्रस्तुत लेखकाच्या भाषणानें ह्या चर्चेस सुरुवात झाली. त्या भाषणाचा सारांश असा : हा शेती-प्रधान देश असल्यामुळें शेतीचें उत्पन्न वाढविलें तर गिरणी-धंद्यास बाजारपेठ मिळून ते धंदे वाढूं शकतील. शेतीचें उत्पन्न प्रत्यक्ष वाढून गिरणी-धंद्याचें उत्पन्न अप्रत्यक्ष वाढतें. यामुळें योजनेंतील शेतीवरील भर अभिनंदनीय होय. शेतीचें उत्पादन कालव्याच्या पाण्यानें सर्वांत अधिक वाढत असल्यामुळें कालवे बांधण्यावर जो जोर दिला आहे तोहि स्तुत्य होय. कालव्याचें पाणी मुख्यत: मोठ्या नद्यांवर मोठीं धरणें बांधून पुरविण्यांत येईल. ह्या धरणांचा खर्च पाहातां हें पाणी महाग पडेल. केवळ मोठ्या शेतकऱ्याला तें परवडेल आणि लहान शेतकरी बुडेल. जमिनीच्या मालकींत ही जी असमानता निर्माण होईल ती योजनेच्या उद्दिष्टास मारक आहे. लहान शेतकऱ्यासहि पाणी परवडावें अशी इच्छा असली तर जास्तींत जास्त किफायतशीर पिकांची योजना हातीं घेतली पाहिजे. तसेंच पाण्याचा दर कमी करण्यासाठीं धरणांवर जी वीज तयार होईल त्या विजेवर धरणांचा बराचसा चालता खर्च टाकला पाहिजे. कर्जबाजारी शेतकरी योजनेचा फायदा करून घेऊं शकणार नाहीं. पण कर्ज फेडण्यासंबंधीं कोणतीच तरतूद योजनेंत नाहीं. शेतकऱ्यास जो पैसा यापुढें कर्जाऊ दिला पाहिजे त्या बाबतींत योजना बहुंशीं सहकारी संस्थांवर अवलंबून आहे. सहकारी संस्थांचा आतांपर्यंतचा अनुभव फारसा उत्तेजक नाहीं. पंचवार्षिक योजनेच्या नव्या आवृत्तींतील 'सहकारी संस्थां'वरील एक सबंध १० वें प्रकरण वाचल्यावर असें वाटतें कीं, सहकारी तत्त्वांत 'विकेंद्रीकरणाचा, स्थानिक पुढारीपणाचा आणि स्वयंसेवेचा' जो लोकशाही गुण आहे त्यावर भाळून आमचे योजनाकार सहकारी संस्थांवर विसंबत आहेत. त्याऐवजीं गाडगीळ-समिती-(Agricultural Finance Sub-committee)च्या अहवालांत उल्लेखिलेल्या, शेतकऱ्यांना कर्ज देणारी 'कार्पोरेशन' व दुष्काळी आणि मागसलेल्या भागाला मदत देणारी 'फार्म सेक्युरिटी ॲडमीनिस्ट्रेशन' या संस्था निर्माण करावयास हव्या होत्या.—प्राचार्य द. गो. कर्वे यांनीं यावर असें उत्तर दिलें कीं, गाडगीळ-समितीच्या शिफारशी योजनेच्या विचारकक्षेंत येत नव्हत्या.—सामुदायिक शेतीच्या बाबतींत अल्पसंख्य अशा विरोधक शेतकऱ्यांवर, त्यांनीं सामुदायिक शेतींत भाग घ्यावा, अशी बळजबरी केली पाहिजे, असें अधिकारी विचारवंतांचें मत आहे. पण योजनेंत तसा उल्लेख नाहीं. योजनासमितीवर सर्वोदयवादी सदस्य असल्याचा हा परिणाम असेल. योजनासमितीचे अधिकारी प्रा. अंजारिया आणि आर. के पाटील यांनीं सांगितलें कीं, निदान ह्या योजनेंत तरी आम्ही असें बळजबरीचें तत्त्व वापरणार नाहीं. पाटील यांचा तर असा अनुभव आहे कीं, त्यांच्या प्रादेशिक राज्यांतील विकासकार्यक्रमांत शेतकऱ्यांचा अत्यंत उत्साह दिसत आहे. हा उत्साह कसा चालू ठेवायचा, त्याला योग्य मार्ग कसा लावायचा, असा त्यांच्यापुढें प्रश्न पडला आहे. जमिनीच्या एकाच मालकानें कमाल किती जमीन ठेवावी ह्या बाबतींत मर्यादा घालण्याचा, योजनेच्या पूर्वीच्या कच्च्या आराखड्यांत विचार केला नव्हता. पण नव्या आवृत्तींत ही सुधारणा केली आहे. 'सामुदायिक खेड्या'नें फारशी सुधारणा होणार नाहीं. या खेड्यांत जमिनीच्या मालकांना दर वर्षी










व्याज ( डिव्हिडंड ) देत राहून पोसून ठेवणें योग्य आहे का ? शेतीची पुनर्घटना होत जाईल तसा हा व्याजाचा दर वाढेल असें म्हटलें आहे. ह्या गोष्टी शेतकऱ्यास उत्तेजन देण्याशीं सुसंगत कशा ठरतात ? प्रत्येक खेड्यामध्यें 'जनपद–उत्पादनसमिति' ठेवण्याची तरतूद कच्च्या आराखड्यांत होती. ही समिति खेड्यांसाठीं योजना आंखून, ती पार पाडणार होती. योजनासमिति दिल्लीला बसली नसून प्रत्येक खेड्यांत अशा रीतीनें पोंचणार होती. पण नव्या आवृत्तींत ही जनपद-समिति लुप्त झाली आहे ! प्रा. अंजारियांनीं यावर उत्तर दिलें कीं, ही समिति ठेवणें शक्य वाटलें नाहीं.

## योजना आणि पैसा

योजनेसाठीं पैसा कुठून आणावा हा एक मोठा प्रश्न आहे. पैसा हा अनुयायी आहे, नेता नव्हे असें म्हणणें सोपें आहे. पण पैसा उभा करायचा झाला म्हणजे खऱ्या अडचणी लक्षांत येतात. दिल्लीचे डॉ. व्ही. के. आर्. व्ही. राव ह्यांनीं चिकित्सक दृष्टीनें एक व्याख्यान दिलें. त्यांच्या मतें योजनेच्या नव्या आवृत्तींत खर्चाचा आकार वाढला असला तरी तेवढ्या प्रमाणांत योजना मोठी झाली, असें नव्हे. सरकारनें हातीं घेतलेला खर्च–जो आराखड्यांतील योजनेंत हिशेबांत धरला नव्हता. तो–नव्या आवृत्तींत योजनेच्या बाजूस धरल्यामुळें योजना मोठी दिसते. योजनेंत एकंदर खर्चापैकीं ३६५ कोटी रुपये कोठून आणायचे त्याचा पत्ता नाहीं. २९० कोटी रुपयांची तूट दाखविली आहे. ती तूट नोटा छापून भरून काढावी लागेल. करांचें उत्पन्न वाढेल असें गृहीत धरलें आहे. पण मृत्यु-करावांचून दुसऱ्या करांची आज शक्यता दिसत नाहीं. मृत्युकरांतून सुरुवातीचीं कांहीं वर्षें कितीसें उत्पन्न मिळेल तें सांगतां येत नाहीं. राज्यसरकारांनीं नेहमींच्या आपल्या उत्पन्नांतून शिल्लक टाकून तो पैसा योजनेसाठीं खर्चीं घालायचा आहे. पण १९५१–५२ ह्या वर्षाच्या अनुभवावरून ह्या शिल्लकेंत घट पडते असें दिसतें. राज्यसरकारें योजनेबाहेरचा खर्च हातीं घेऊन शिल्लक टाकण्यांत हयगय करीत आहेत. शिल्लकांवर कितपत अवलंबून राहावें हा प्रश्नच होय. देशांत लहान कर्जें घेण्याची योजना १९५१–५२ च्या अनुभवावरून यशस्वी होईल असें दिसतें. परदेशी कर्जें मिळण्याची शक्यता फार कमी झाली आहे. भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचा विचार करतां आणि अमेरिकेंत आयसेन्-होअर अध्यक्ष निवडून आले आहेत ही घटना लक्षांत घेतां अमेरिकेकडून कर्ज मिळण्याची फारशी आशा करावयास नको. अमेरिकेचे भारतांतील वकील चेस्टर बौल्स ह्यांनीं लंबीचौडीं अभिवचनें दिलीं असलीं तरी आतां त्यांचा फारसा उपयोग नाहीं. किंबहुना चेस्टर बौल्सना माघारीं बोला-वल्याच्या बातम्याहि येत आहेत. अशा प्रकारें योजनेंत दाखविलेला सर्व पैसा उभा होणें अशक्य दिसतें. प्रा. राव ह्यांच्या मताप्रमाणें पैशाची तूट ५०० कोटि रुपयांपेक्षां कमी यावयाची नाहीं !

एवढी तूट नोटा छापून भरून काढली तर भाववाढ होणें अटळ ठरेल. उत्पादनहि वाढणार आहे, त्यामुळें भाववाढ होणार नाहीं असें म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. उत्पादनवाढीचे इष्टांक पाहिले आणि इष्टांक गांठण्याची मर्यादित शक्यता विचारांत घेतली म्हणजे भाववाढ अटळ आहे ही गोष्ट लक्षांत येईल. भाववाढीस आळा घालण्यासाठीं नियंत्रणें ठेवावींच लागतील. कांहीं लोकांना नियंत्रणें काढण्याची जी घाई लागली आहे ती धोक्याची आहे. नियंत्रणें सर्वत्र नाहीं तरी पण नाक्याच्या जागीं तीं ठेवलींच पाहिजेत. तूट कमी करण्यासाठीं अप्रत्यक्ष कर वाढविण्यासहि हरकत नाहीं योजना म्हणजे भांडवल गुंतवणें होय. भांडवल गुंतवितांना आज त्याग करावा लागतो. पण त्या त्यागाची मधुर फळें पुढें मिळतील या आशेनें आज त्याग केला जातो.

पंचवार्षिक योजनेंतील दीड वर्ष आधींच लोटलें आहे. "पुढील साडेतीन वर्षांच्या काळांत ह्या योजनेला संधि द्या" असें श्री. आर. के. पाटील आणि प्रा. अंजारिया ह्यांनीं कळकळीचें आवाहन केलें. आतां प्रत्येक नागरिकानें मतभेद बाजूला ठेवून, योजनेंत दिसणाऱ्या दोषांमुळें योजना अपेशी ठरूं नये म्हणून सतत प्रयत्न करून योजना उत्साहानें राबवावी, हेंच योग्य दिसतें.










श्री. चंद्रशेखर व्यं. रामन् यांचे विचार[1] : संग्राहक—श्री. का. झि. पाटील

# विज्ञान ही श्रेष्ठ कला

“शास्त्रीय शोध म्हणजे तरी काय? ते लागतात तरी कसे?” हे प्रश्न नेहमींच विचारले जातात आणि त्यांना निरनिराळीं उत्तरें दिलीं जातात. अर्थात्, शोध म्हणजे कांहीं नवी कल्पना किंवा नवें तत्त्व. विज्ञानामध्यें नुसत्या निरीक्षणाला कुठेंच महत्त्व नाहीं किंवा नुसत्या कल्पनेला पण कांहीं स्थान नाहीं. नवीन शोधाला प्रायोगिक आणि तात्त्विक हीं दोन्हीं अंगें पाहिजेत. परंतु दोघांत कोणत्या गोष्टीला जास्त महत्त्व हें शोधावरच अवलंबून आहे. रॉट्जेनचा क्ष-किरणांचा शोध हा प्राधान्यानें प्रायोगिक म्हणतां येईल, तर प्लँकचा ‘क्वान्टम् थीअरी’चा शोध हा प्राधान्यानें तात्त्विक म्हणतां येईल. या दोन शोधांची पद्धति आणि या दोन संशोधकांचा दृष्टिकोन हीं निरनिराळीं आहेत. गणितविषयक शास्त्रांत अशा प्रायोगिक किंवा तात्त्विक संशोधकाच्या दृष्टींतील भेद स्पष्टच होतो. एवढें मात्र खरें कीं, ज्या शास्त्राची उभारणी कल्पनेवरच झालेली आहे त्यांत निरीक्षण व विचारशक्ति यांना वेगवेगळें करणें थोडें कठीणच जातें.

‘शोध’ या शब्दांतच मोठें नाट्य भरलेलें आहे. स्फूर्ति देणारा तो अपूर्व क्षण होय. शोध म्हणजे जणूं काय शेतांत मोठा हिराच सांपडावा! खरोखर, विज्ञानाचा इतिहास म्हणजे नाट्यमय प्रसंगांची यादीच! हें नाट्य आणि ही स्फूर्ति संशोधकाच्या वैयक्तिक जीवनांत शोधानंतर तावडतोब दिसून येतात. तुम्हांला आर्किमिडीजची एक जुनी गोष्ट माहित असेलच. आंघोळ करीत असतांना त्याला स्वतःच्या प्रश्नाचें गूढ उकललें तेव्हां तो तसाच अंगावर कांहीं न घेतां रस्त्यांतून ‘सांपडलें’, ‘सांपडलें’ म्हणून ओरडत निघाला. त्या आनंदाचें वर्णन करणें कठीणच. सर्व जीवनांत क्वचितच असा नाट्यमय क्षण येतो. हेंच संशोधकाच्या भक्तीचें फळ म्हटलें पाहिजे. सामान्य शोध बरेच लागतात आणि त्यांनीं समाधान व उत्साह मिळतो. परंतु मनाला उन्मनी अवस्थेप्रत नेणारा ब्रह्मानंद ज्यानें प्राप्त होतो असा शोधक्षण विरळाच!

एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. ती म्हणजे अद्वितीय शोधांना प्रथम जगाकडून पाहिजे तेवढा मान आणि वाहवा मिळत नाहीं. कांहींना वाटतें कीं, या संशोधकाला दैवानें हात दिला किंवा लॉटरीच्या तिकिटासारखा शोध त्याच्या हातीं आला! परंतु अशा मतांना किती महत्त्व द्यावयाचें आणि त्यांत किती अर्थ आहे हें ज्याचें त्यानें ठरवावें. शोध कांहीं वाटेल त्या माणसाला लावतां येत नाहींत. योग्य तो संशोधकच तें काम करूं शकतो. दैवाचें त्यांतील स्थान उपेक्षणीय आहे. शास्त्रांतील खऱ्या संशोधकाला सत्याचा ध्यास लागलेला असतो आणि तो ज्या शाखेंत काम करीत असतो त्यांत कांहीं तरी नवीन भर टाकायची त्याला उमेद असते. दैववादी टीकाकारांना एवढ्या गोष्टीची जाणीव पाहिजे कीं, निरीक्षण केलेल्या गोष्टींतून सत्य शोधून काढण्यासाठीं, संशोधकाला त्या शास्त्राचें ज्ञान आणि अंगीं कुवत पाहिजे. योग्य विचार करून ठरविलेल्या गोष्टींतूनच प्रायः शास्त्रीय शोध बाहेर येतात. किती तरी महिने किंवा वर्षें चालविलेल्या शास्त्राच्या अभ्यासाचें व संशोधनाचें फळ म्हणजेच शोध होय.

कांहीं वेळां जगाला मूलतः नवीन निरीक्षण केलेल्या गोष्टींचें महत्त्व हळू हळू, उशिरा समजतें. प्रथम नवीन कल्पनांकडे संशयित दृष्टीनेंच लोक बघतात. अर्‍हीनिअस (Arrhenius) या स्वीडिश संशोधकाची अशी गोष्ट सांगतात. त्यानें डॉक्टरेट पदवीसाठीं लिहिलेल्या प्रबंधांत द्रवाच्या स्वरूपाविषयीं नवीन तत्त्व मांडलें होतें. पण अशा या अद्वितीय संशोधनाला तिसऱ्या वर्गांत नव्हे, तर चौथ्या वर्गांत

---

१ सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ श्री. चंद्रशेखर व्यं. रामन् यांच्या ‘Aspects of Science’ या पुस्तकांतून हे विचार संग्रहीत केले आहेत.








कसेंबसें स्थान देण्यांत आलें ! त्यामुळें मात्र अन्हीनिअसला विद्याक्षेत्राबाहेर राहावें लागलें. या उपेक्षेच्या दुःखांतच तो जीवन जगत होता. मात्र शेवटीं, शास्त्रज्ञांना त्याच्या संशोधनाचें महत्त्व कळून चुकलें. त्याला नोबेल पारितोषिक देण्यांत आलें आणि स्वदेशाचा मोठा शास्त्रज्ञ म्हणून त्याचा गौरव झाला. तरुण कल्पनाशक्तीला वर न येऊं देण्याची अशींच खूप उदाहरणें देतां येतील.

विज्ञानाच्या इतिहासांत आणखी एक गोष्ट स्पष्टच दिसते. आणि ती म्हणजे तारुण्यसुलभ कल्पनाशक्ति आणि अद्वितीय शोध यांचें साहचर्य. एखाद्या विज्ञानशाखेंत ग्रंथ लिहावयाचें ठरविलें आणि तरुणांचे शोध तेवढे वगळले तर लिहायला फारच थोडें उरेल ! संशोधन यशस्वी होण्यासाठीं वयोवृद्धता किंवा ज्ञानवृद्धता नव्हे, तर नव्या तरुण उत्साहानें प्रेरित झालेला दृष्टिकोन पाहिजे. आणि ती तर तरुणांनाच निसर्गाची देणगी होय. जुन्या कल्पनांना चिकटून राहणारे वयोवृद्ध किती तरी नव्या संशोधकांचे पाय मागें ओढीत असतात. नवीन कल्पना तरुण मनालाच लवकर स्फुरतात. अर्थात्, प्रत्यक्ष काम करून त्या कल्पनेंतुन शोध निर्माण करण्यासाठीं खूपच वेळ लागतो. तथापि वय आणि अनुभव संशोधनकार्यांत अगदींच निरुपयोगी आहेत असें मात्र नव्हे. उलट, कांहीं प्रमाणांत या वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध शास्त्रज्ञांमुळें तरुणांच्या कल्पनाशक्तीची स्वैरता ताब्यांत ठेवतां येते. उलट, तरुणांचा उत्साह व चैतन्यशक्ति वृद्धांना जास्त स्फूर्ति देतात. हे ज्ञानवृद्ध लोक जुन्या मताला चिकटून न राहतां आणि तरुणांच्या कल्पनाशक्तीला न दडपतां उपयोगी पडले तर ते अत्यंत उत्तम मार्गदर्शक व उत्साहदाते होतील.

वैज्ञानिक संशोधकाला प्रेरणा कोठून मिळते ? मला वाटतें संशोधनांत गुंग होणारे लोक आपल्याला कांहीं तरी करायचें आहे या तळमळीनें कर्तव्यरत झालेले असतात. चित्रकार, शिल्पकार आणि कवी यांना निसर्गानें प्रेरणाशक्ति दिलेली असते. आणि ते आपल्या माध्यमांतुन—म्हणजे चित्र, शिल्पकाम व काव्य यांतून—ती व्यक्त करतात. शास्त्रज्ञहि निसर्गाचाच भक्त आहे ! त्यापासूनच तोहि प्रेरणाशक्ति घेत असतो. तो पण स्वतःच्या विचार सृष्टींत निसर्गाला निर्माण करीत असतो. निसर्गाच्या अनंत गूढातून तो लहानसें सार्थ तत्त्व शोधून काढतो आणि त्यालाच निसर्गाचा नियम म्हणतो. ह्या गोष्टी करीत असतांना कलावंताप्रमाणें शास्त्रज्ञ स्वतःला ज्या शिस्तीच्या बंधनांनीं बांधून घेतो त्यालाच तर्कशास्त्र म्हणतात. विज्ञानानें निर्मिलेल्या या निसर्गाच्या चित्राला तर्कशास्त्राचे सर्व नियम लागू आहेत. खरोखर, बौद्धिक सौन्दर्य हेंच खरें व श्रेष्ठ सौन्दर्य होय. विज्ञान म्हणजे दुसऱ्या भाषेंत सांगायचें तर मानवी भावना आणि बुद्धि यांना दिव्यता देऊन निसर्गाचें स्वरूप पुढें मांडण्यासाठीं केलेली तपश्चर्या होय. म्हणूनच विज्ञान म्हणजे श्रेष्ठ कला होय.

---

पत्रव्यवहार

# तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाची ऐतिहासिक पद्धति

तत्त्वज्ञानाचें अध्ययन व अध्यापन करण्याचे दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार प्रवचन-पद्धती-( interpretative )चा व दुसरा इतिहासपद्धती-( historical )चा. प्रवचनकार ज्याप्रमाणें आपल्या श्रद्धेला पटलेल्या गोष्टी निरानिराळ्या उदाहरणांनीं श्रोत्यांना पटवून देतो त्याप्रमाणें तत्त्वज्ञानाचे अध्यापक आपल्याला पटलेल्या एखाद्या तत्त्वाचा आविष्कार तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत कसा होत आला आहे तें दाखवितात. तत्त्वज्ञानाच्या आजपर्यंतच्या अध्यापनांत हीच पद्धति अनुसरली गेली आहे. या पद्धतीपेक्षां निराळी पद्धति म्हणजे तत्त्वज्ञान हें त्या त्या युगांतील सामाजिक, राजकीय,








आर्थिक, धार्मिक, भाषिक इत्यादि घटनांशीं कसें संबद्ध होतें हें दाखविणारी इतिहासपद्धति. रसेलचें 'History of Western Philosophy' हें या दुसऱ्या पद्धतीनें लिहिलें गेलेलें पुस्तक आहे. प्रा. दामले ('नवभारत', जानेवारी १९५३, पान ५६) हे रसेलच्या पुस्तकाकडे प्रवचनपद्धतीच्या दृष्टीनें पाहात असल्यानें त्यांना तें पुस्तक उथळ वाटलें. रसेलनें इतिहासपद्धतीचें वैशिष्ट्य आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत स्पष्ट केलें आहे. त्या प्रस्तावनेंतील महत्त्वाच्या विधानाचा अनुवाद देतों :

"तत्त्वज्ञानाचे इतिहास पुष्कळ लिहिले गेले आहेत; परंतु माझ्या माहितीप्रमाणें त्या इतिहासलेखकांपुढें, मीं जो माझ्यापुढें हेतु ठेवला आहे, तो नव्हता. तत्त्वज्ञ हे परिणाम आणि कारण दोन्हींहि असतात : त्यांच्या वेळच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीचे, तत्कालीन संस्थांचे ते परिणामरूप असतात...तत्त्वज्ञानाच्या बहुतेक इतिहासांमध्यें, प्रत्येक तत्त्वज्ञाचें चित्रण जणूं एखाद्या पोकळी-(vacuum)मध्यें केलेलें दिसून येतें; फार तर त्या तत्त्वज्ञाचा पूर्वींच्या तत्त्वज्ञांशीं संबंध दाखविण्याशिवाय, त्या तत्त्वज्ञाच्या तत्त्वांचा तत्कालीन परिस्थितीशीं कांहीं संबंध असल्याचें त्या इतिहासांतून प्रतीत होत नाहीं. उलट पक्षीं, प्रस्तुत इतिहासांत माझा असा प्रयत्न आहे कीं, प्रत्येक तत्त्वज्ञ त्या त्या वेळच्या परिस्थितीचा परिणाम आहे, असें सत्याच्या मर्यादा सांभाळून दाखवून द्यावें....तत्त्वज्ञान ही केवळ कांहीं संप्रदायांचीच मिराशी नव्हे किंवा कांहीं मूठभर विद्वानांचा वादविवाद म्हणजे तत्त्वज्ञान, असेंहि नव्हे. प्राचीन काळींहि अशीच परिस्थिति होती. समाजजीवनाचा एक अविभाज्य भाग म्हणून तत्त्वज्ञान फार पूर्वींपासून चालत आलें आहे आणि त्याच दृष्टीनें मीं विवरण केलें आहे. जर या पुस्तकांत कांहीं गुण असेल, तर तो या दृष्टिकोनामुळेंच होय" (पृ.५-६).—रसेलनें पुरस्कारिलेली ही इतिहासपद्धति प्रा. दामले यांना मान्य नसेल तर त्याबद्दल माझें कांहींच म्हणणें नाहीं.

इतिहासपद्धतीच्या दृष्टीनें ॲरिस्टॉटल्‌चेंच काय पण अगदीं कालपरवांपर्यंतचें तत्त्वज्ञान देखील इतिहासजमा झालें आहे असें म्हटलें तर त्यांत त्या तत्त्वज्ञानाचा अपमान करण्याचा उद्देश मुळींच नाहीं. ज्या संस्कृतींत प्लेटो-ॲरिस्टॉटल् जन्मले त्या श्रीमंतीप्रवण (aristocratic) संस्कृतीच्या तत्त्वांना अनुसरून त्यांनीं, कोणतेंहि हस्तव्यवसायाचें काम करून पोट भरणाऱ्या माणसाला, नीच ('banausic'—'Politics' VIII, 6, 3 ff.) संबोधून हेटाळलें व अशा माणसाला शिकविणें किंवा त्याच्यापासून कांहीं शिकणें हें कमीपणाचें मानलें. हे हस्तव्यवसाय करणारे गवंडी, पाथरवट वगैरे यांच्या प्रयत्नांतून शास्त्रीय ज्ञानाची वाढ होऊं शकेल, हें प्लेटो-ॲरिस्टॉटल् यांच्या ध्यानीं आलें नाहीं. हा आंधळेपणाचा आरोप त्यांच्यावर इतिहासकारानें केला तर त्यांत कांहींच वावगें नाहीं. त्याचप्रमाणें प्लेटो-ॲरिस्टॉटल् यांचें तत्त्वज्ञान भाषिक दृष्टीनें तपासलें तर त्यांनीं निर्माण केलेले Categories सारखे तात्त्विक प्रश्न केवळ तत्कालीन भाषेच्या गोंधळांतून निर्माण झाले आहेत असें आढळतें (पाहा : T. Gomperz, 'Greek Thinkers', IV, pp. 40-41). ॲरिस्टॉटल्‌च्या तर्कशास्त्राची हीच कथा आहे. शब्द आणि त्यांनीं बनणारीं विधानें यांचीं प्रमेयें म...ीं कीं विश्वाचें ज्ञान मिळतें या विश्वासानें तें त...शास्त्र रचलें गेलें. या तर्कशास्त्राला पुढें विज्ञान नें हरताळ फांसला हा इतिहास डोळ्यांपुढें असल्यावर ॲरिस्टॉटल्‌चें पारडें जड म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. ॲरिस्टॉटल्‌चें स्थान कालसापेक्ष आहे. त्यानें निर्माण केलेल्या भाषिक शाश्वततेच्या कल्पनेला बळी पडून त्याचे भक्त त्याला अमरपद देत असतील तर खुशाल देवोत. उच्छिष्टाचा अभिमान बाळगणें व 'जुनें तें सोनें म्हणणें' या प्रवचनपद्धतीच्या रूढीच आहेत.

—दिनेश द. माहुलकर
बडोदें.

## शांततापरिषदेंत रवीन्द्रनाथांचें गीत

स्व. रवीन्द्रनाथांचें एक गीत पेकिंगच्या आशिया–शांततापरिषदेंत दोन समारंभांत कविवर्यांच्या (भावाच्या) नातीनें म्हटलें. आजच्या भयाकुल आंतरराष्ट्रीय वातावरणांत त्या गीताचा प्रतिध्वनि प्रत्येक मानवप्रेमी व्यक्तीच्या हृदयांत उमटल्यावांचून राहणार नाहीं. मूळ बंगाली सहज समजण्यासारखें असल्यामुळें पुढें तें मूळ गीतच उद्‌धृत केलें आहे. सुप्रसिद्ध गुजराती 'संस्कृति' मासिकाच्या डिसेंबरच्या अंकांत सदरहू शांतिपरिषदेसंबंधींचा वृत्तांत संपादक श्री. उमाशंकर जोशी यांनीं सादर केला आहे. त्या लेखाच्या आरंभीं हें गीत दिलेलें आहे. तेथून तें येथें उद्‌धृत केलें आहे. (गीताची म्हणण्याची चाल व ताल हीं आपल्याकडील 'परिलीना' जातींतील पांडुरंगाच्या आरतीसारखीं असलीं पाहिजेत.):

" हिंसाय उन्मत्त पृथ्वी नित्यनिठुर द्वन्द्व
घोर कुटिल पंथ तार लोभजटिल बंध
नूतन तव जन्म लागि कातर जत प्राणी
करो त्राण महाप्राण ! आणो अमृत वाणी
विकसित करो प्रेमपद्म चिरमधुनिष्यन्द
शांत हे ! मुक्त हे ! हे अनंतपुण्य !
करुणाघन धरणीतल करो कलंकशून्य

क्रन्दनमय निखिल हृदय तापदहनदीप्त
विषयाविषाविकारजीर्ण खिन्न अपरितृप्त
देशदेश परिल तिलक रक्तकलुष ग्लानि
तव मंगल शंख आणो तव दक्षिण पाणि
तव शुभ संगीत राग तव सुंदर छन्द
शांत हे ! मुक्त हे ! हे अनंतपुण्य !
करुणाघन धरणीतल करो कलंकशून्य. "

## पेकिंगची आशिया-शांततापरिषद्

गेल्या ऑक्टोबरच्या दोन तारखेपासून पुढें पेकिंग येथें आशियांतील राष्ट्रांतील शांततावादी प्रतिनिधींची शांततापरिषद् झाली. या परिषदेबद्दलचे अनेक वृत्तांत वृत्तपत्रांतून आलेले आहेत. पुण्याचे श्री. र. के. खाडिलकर व मुंबईचे प्रा. न. र. फाटक हेहि प्रतिनिधि म्हणून गेले होते. या शांततापरिषदेच्या निमित्तानें त्यांना चिनी जीवनाचें जें दर्शन घडलें त्यावर निरनिराळ्या मराठी नियतकालिकांतून त्यांनीं लिहिलेल्या लेखमाला वृत्तपत्रवाचकांना सुपरिचित आहेतच. 'संस्कृति' (अहमदाबाद) मासिकाच्या संपादकांनींहि परिषदेचा वृत्तांत दिला आहे. संपादक श्री. उमाशंकर जोशी हे स्वतः गांधीमतानुवर्ती शांततावादी आहेत. त्यामुळें त्या वृत्तान्ताला निराळ्या दृष्टीनें महत्त्व आहे. त्यांच्या लेखांतील ('संस्कृति', डिसेंबर, १९५२) महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

" ...शांतिपरिषदेचे कित्येक प्रतिनिधि ता. २९ सप्टेंबरपर्यंत येऊं न शकल्यामुळें परिषद् ऑक्टोबरच्या २ तारखेपर्यंत पुढें ढकलली. २ ऑक्टोबर पसंत करतांना आपले प्रतिनिधि डॉ. ज्ञानचंद व श्री. रविशंकरमहाराज यांनीं असें सांगितलें कीं, ही तारीख जगांतील एक महान् शांतिप्रेमी–महात्मा गांधी–यांचीहि जन्म तारीख आहे. दक्षिण अमेरिकेच्या एका प्रतिनिधीनें गांधीजींना आदरांजलि अर्पण करीत या गोष्टीचें महत्त्व स्पष्ट केलें... परिषद् पुढें १२ तारखेपर्यंत चालली.

" शांततापरिषदेच्या कार्यांत साम्यवादी खूप उत्साह दाखवितात हें खरें; पण त्यांत युद्धाला विरोध करणारे अनेक तटस्थ आणि अन्य पक्षांचे लोकहि भाग घेत आहेत. मागें जगत्-शांततापरिषद् वॉर्सा येथें भरली होती. यंदां ती व्हिएन्ना मुक्कामीं भरली होती. या कामांतील कार्यकर्ते, ती केवळ साम्यवादी पक्षाचीच कार्यप्रवृत्ति न राहतां, अनेक भिन्नभिन्न पक्ष, धर्म, जाती, देश वगैरेंमधील लोकांना तींत भाग घेतां यावा, अशा विस्तृत पायावर तिची उभारणी करूं पाहात आहेत. ही गोष्ट जगांतील शांततेच्याच फायद्याची आहे, असें उत्तरोत्तर त्यांच्या अनुभवाला येत आहे. जगत्-शांततासमितीचे आफ्रिकावासी नीग्रो उपाध्यक्ष म. दार्बुशिये यांनीं आपल्या भाषणांत म्हटलें होतें कीं, (१) कोरिया, व्हिएटनाम, मलाया येथील युद्ध बंद व्हावें, (२) 'थंड युद्धा'चा अंत व्हावा व भिन्न लोकांमध्यें सामान्य आर्थिक-सांस्कृतिक संबंध स्थापले जावेत आणि (३) प्रत्येक देशाची राष्ट्रीय स्वतंत्रता व सुरक्षितता यांबद्दलची हमी मिळावी–या तीन








गोष्टी इच्छिणारे लोक कोणत्याहि मताचे असले तरी त्यांना जगत्-शांततेच्या कार्यात सामील होतां येईल. –साम्यवाद्यांनाहि या गोष्टींचें महत्त्व समजलें आहे, असें म्हणतां येईल. देशादेशांत निरनिराळ्या प्रकारची समाजव्यवस्था असतांहि,. सर्व लोक गोडीगुलाबीनें राहूं शकतील, असा विचार आतां साम्यवाद्यांच्या तोंडूनहि वारंवार ऐकावयास सांपडतो...जगांत शांतता असावी, युद्धाच्या हत्याकांडापासून जग वांचावें, युद्धाची लटकती तलवार दूर सरावी, या गोष्टि साधत असतील तर कोणत्याहि एकाच विचारसरणीला अभिमानानें चिकटून राहण्यांत शहाणपणा नाहीं असें समजूं लागले आहेत. पेकिंग-परिषद् म्हणजे अनेक राष्ट्रांतील विविध पक्ष, धर्म, जाती मानणाऱ्या माणसांना केवळ शांततेच्या लालसेनें विशाल भूमिकेवर एकत्रित करावयाचा एक सुंदर प्रयत्न होता.

"व्यासपीठावर कलावंत पिकासोच्या 'डोव्ह्' (कबूतर) या शांतताप्रतीक-चित्राच्या आजूबाजूला ३८ राष्ट्रांचे ध्वज होते. जगांतील १६० कोटि लोकसंख्येच्या राष्ट्रांतील ३६७ प्रतिनिधि एकत्र आले होते. निरीक्षक म्हणून ३७ लोक हजर होते. निरनिराळ्या आंतरराष्ट्रीय संस्थांचे १० प्रतिनिधि आणि खास आमंत्रित १३ पाहुणे हे परिषदेंत उपस्थित होते. याशिवाय २ प्रेक्षक होते.

"शांति-परिषद् पेकिंगच्या लोकसभागृहांत–जेथें १९४९ च्या आक्टोबर १ ला नव्या चीनच्या जनतेनें आपलें नवें राज्य स्थापन झाल्याची घोषणा केली होती त्या विशाल दालनांत भरविण्यांत आली होती. परिषदेच्या खुल्या बैठकींत एकंदर १०० भाषणें झालीं...अनेक देशांना पुष्कळसें बोलावयाचें होतें, विशेषतः दक्षिण अमेरिकेच्या देशांना. सर्वांना वेळ देण्यांत येत होता. आठ भाषांत एक एक व्याख्यान एकदम ऐकावयास मिळे. ध्वनिग्रहण-यंत्र डोक्यावर ठेवून, कानांवर लावून हवें तें भाषण ऐकतां येई.

"उद्घाटनाचें व्याख्यान मादाम सन्‌यत्सेन यांनीं केलें. माणूस शांति उत्पन्न करीत राहीलच आणि जगांतील शांतीचा प्रत्येक राष्ट्राच्या स्वतंत्रतेशीं गाढ संबंध आहे, यांवर त्यांनीं भर दिला होता...त्यानंतर पेकिंगच्या मेयरनीं छोटें स्वागतपर भाषण केलें. नंतर कोरिया, जपान, राष्ट्रीय स्वतंत्रता, पांच राष्ट्रांतील शांतताकरार, सांस्कृतिक देवघेव, स्त्री-बालकविषयक स्थिति, आर्थिक विनिमय व सर्वसामान्य ठरावाचा मसुदा–अशा निरनिराळ्या आठ कामांसाठीं सर्व प्रतिनिधींची विभागणी झाली. या निरनिराळ्या कमिशनांच्या अहवालांवर चर्चा होऊन ठरावरूपानें ते सर्वानुमतें संमत झाले... परिषदेच्या संचालनाची पद्धत पुरेपूर लोकशाही तऱ्हेची होती. कोणाचाहि थोडासा मतभेद असल्यास तो समजून घ्यावयाचा प्रयत्न होत असे. इतक्या वेगवेगळ्या मतांचे लोक एकत्र आले होते कीं, ज्यांत कोणाच्याहि मताला धक्का न लागेल आणि सर्वांच्या हृदयांतील भावनेचें प्रतिबिंब पडेल, असा मसुदा तयार करण्यांत सर्वांना शिक्षण चांगलें मिळालें. सर्वांना शांततेचें ध्येय अभिप्रेत होतें. त्यामुळें तेवढ्या एका गोष्टीची काळजी घेऊन समान भूमिका शोधण्याचें कार्य शक्य होतें. चीन स्वतः आपलें अपूर्व आतिथ्य परिषदेला देऊन, जणूं कांहीं दूर उभा राहिला होता! खुल्या अधिवेशनांतील प्रारंभींचीं व्याख्यानें सोडतां, बाकी १०० व्याख्यानांत जंतु-युद्धाबाबत चिनी जंतुशास्त्रज्ञानें दिलेलें एक व्याख्यान तेवढेंच चीनचें भाषण म्हणतां येईल. चिनी जनतेचा संयम व शहाणपण आणि लोकशाही पद्धतीबद्दलचा आदर या गोष्टींचा परिचय तेथें हजर असलेल्या कोणालाहि झाल्यावांचून राहिला नाहीं.

"जपानांत एकहि परदेशी सैनिक किंवा परदेशी लष्करी ठाणें असूं नये; जपानच्या लोकांना शांत व स्वतंत्र जीवन जगायची मोकळीक असावी; कोरियाचें युद्ध थांबावें; अमेरिकन सैन्यें तेथून निघावींत; चिनी स्वयंसेवकांप्रमाणेंच इतर कोणीहि परदेशी सैनिक तेथें नसावा; आशिया व पॅसिफिक प्रदेशांतील राष्ट्रांना राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळावें; या सर्व राष्ट्रांत मुक्त व्यापार व सांस्कृतिक व्यवहार चालावा;–इत्यादि पेकिंग परिषदेंतील ठराव, आजच्या काळांत जगांत शांतता असावी असें मानणाऱ्या कोणाहि व्यक्तीचा पाठिंबा मिळावा असेच आहेत...

"चिनी जनतेला शांतता पाहिजे आहे.













अनुक्रमणिका

शहरांत जा कीं खेडेगांवांत जा, सर्वांना शांतता पाहिजे आहे हें सहज दिसून येईल. नदीच्या योजनेवर ६० हजार मजूर एकत्रित काम करीत असतांना आम्हीं पाहिले. कालवे खोदण्याच्या बाबतींत पाहतां, चीननें गेल्या तीन वर्षांत पनामा कालव्याच्या दसपट व सुएझच्या तेवीसपट खोद-काम केलें आहे...विविध कार्यांत दंग असलेल्या जनतेला शांततेवांचून दुसरें कांहीं आवडत असेल असें मानणें कठीण आहे.

" चिनी लोकांना हिंदुस्थानबद्दल स्वाभाविक बंधुभाव आहे हें आम्हांला जिकडेतिकडे दिसलें. तसेंच इतर देशांचीहि हिंदुस्थानबद्दल सन्मानाची भावना आहे असेंहि आम्हांला आढळलें. प्रमुख मंडळांत व अन्यत्र अगत्याच्या ठिकाणीं हिंदी प्रतिनिधींना पुढें केलें जात होतें. पूज्य रविशंकर-महाराजांनीं आपली शांततेबद्दलची विचारसरणी मांडली आणि आक्रमणाला प्रोत्साहन देणाऱ्या शोषणक्रियेंत जी एक भोगाची वासना आहे तिचा विरोध केला पाहिजे यावर भर दिला. त्यांचें भाषण अत्यंत आदरपूर्वक ऐकलें गेलें व त्या दिवशीं भाषणें पुरीं झाल्यावर उभें राहून अभि-वंदन करण्याची नेहमींची प्रथा बंद असतांहि सर्व सभागृह उभें राहिलें होतें. अनेक देशांच्या लोकांनीं भाषण पसंत पडल्याचें सांगितलें.

" शांततापरिषदेच्या या संक्षिप्त अहवालाचें समालोचन करीत असतां, पेकिंग युनिव्हर्सिटीचे संस्कृतचे अध्यापक चिन् के मु यांनीं एकदां एका वार्तालापप्रसंगीं म्हटलेला श्लोकार्ध आठवल्यावांचून राहात नाहीं : ' नीचाः कलहमिच्छन्ति
शान्तिमिच्छन्ति साधवः । ' "

## ' कॅन्सर 'विषयक संशोधन

मनुष्याच्या संहारासाठीं निसर्गानें जे रोग निर्माण केले आहेत त्यांतील ' कॅन्सर ' ( कर्क ) या रोगासारखा यातनामय रोग दुसरा नाहीं. या रोगावर प्रतिबंधक किंवा निवारक उपाय अजून तरी निश्चित असा सांपडलेला नाहीं. जगांतील कांहीं राष्ट्रांत या रोगासंबंधींच्या संशोधनासाठीं मोठमोठ्या संस्था आहेत. हिंदुस्थानांत मुंबईतील ' टाटा मेमोरिअल हॉस्पिटल 'मध्यें असें संशोधन-कार्य चालू आहे. त्याचेंच आतां विस्तृत स्वरूप होऊन ' भारतीय कर्करोग-संशोधन-केन्द्र ' नुकतेंच ( ३० डिसेंबर १९५२ ) सुरू झालें आहे. ' आंतरराष्ट्रीय कर्करोग-संशोधनमंडळा 'चें ५ वें अधिवेशन भारतीय केन्द्राचे संचालक डॉ. खानोलकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें असतां, ह्या भारतीय केन्द्राचें उद्घाटन करण्यांत आलें. आंतर-राष्ट्रीय मंडळाच्या अधिवेशनाला अनेक पाश्चात्त्य-पौर्वात्य देशांतील अधिकारी तज्ज्ञ आलेले होते व त्यांनीं एकमुखानें डॉ. खानोलकर यांच्या कार्याचें महत्त्व स्पष्ट केलें. म्हणून त्या प्रसंगाच्या निमित्तानें पुढील कॅन्सरसंशोधनविषयक माहिती ' टाइम्स ऑफ इन्डिआ 'च्या ३१ डिसेंबरच्या एका खास लेखांतून संकलित करून दिली आहे :

गेल्या ५० वर्षांत या ' कर्करोग ' किंवा कॅन्सर रोगाविषयीं मुख्य संशोधन होऊन बरीच माहिती हातीं लागली आहे. हा रोग मानव व मानतेवर सृष्टींतहि आहे. वनस्पति, मासे, बेडूक, पक्षी, सस्तन प्राणी आणि मानव या सर्वांना हा रोग होत असतो. जरी हा रोग अनेक वेळां उतार वयांत विशेष आढळत असला तरी तो केव्हांहि व कोणालाहि होऊं शकतो. हा रोग कोणत्याहि बाह्य जंतूंपासून होत नसून रोग्या-च्या स्वतःच्या शरीरांतीलच एखाद्या सूक्ष्म तंतुमय ( tissue ) द्रव्यांतील कांहीं पेशींची अनिर्बंध आणि बेताल वाढ हेंच याचें गमक आहे. म्हणूनच तो संसर्गजन्य नाहीं. या रोगाच्या वाढीलाहि कांहीं मर्यादा नसते. इतर जंतुमय रोगांना शरीरांतील नैसर्गिक घटक प्रतिबंध करीत असतात. औषधानें या प्रतिबंधाला मदत मिळत असते. उलट, कॅन्सरला जर बाहेरून प्रतिबंध झाला नाहीं तर त्याची वाढ अतोनात होऊन तो शेवटीं प्राणघातक होतो. दुसराहि एक महत्त्वाचा फरक आहे. इतर जंतुमय रोगांत रोगजंतूंच्या सजीव पेशी व शरीरांतील पेशी यांत बरेंच अंतर असतें. त्यामुळें शरीरांतील निरोगी तंतुमय द्रव्याला बाधा न होईल अशा प्रकारें प्रति-बंधक उपाय करतां येतात. पण कॅन्सर ही शरीरां-तील पेशींचीच वाढ असते, म्हणजेच रोगट पेशी व निरोगी पेशी यांत मूलभूत फरक नसतो. त्यामुळें रोगट पेशींना प्रतिबंधक ठरणारें औषध इतर







पशीनाहि बाधक ठरण्याचा अतिशय संभव असतो. या कारणामुळें कॅन्सरवरील इलाजहि अशक्यप्राय होतात.

कॅन्सरच्या चिकित्सेसाठीं अत्यंत निष्णात मंडळी आणि अत्यंत महाग उपकरणें आवश्यक असतात. कॅन्सरवरील मुख्य इलाज म्हणजे 'कर्कदुष्ट' शरीरविभागाचें शस्त्रक्रियेनें किंवा अन्य प्रकारें उच्चाटन करणें हा आहे. पण ही गोष्ट फारच कठीण आहे. कारण कॅन्सर शरीरांतील कोठल्याहि भागीं होऊं शकतो. सरळ शस्त्रक्रिया, क्ष-किरण-चिकित्सा, रेडिअम् किंवा अन्य किरणोत्सर्गी द्रव्याचा उपयोग यांसारखे उपाय सध्या केले जातात. रोगाचें निदान जर प्रारंभिक अवस्थेंत झालें तर बरेच वेळां तो आटोक्यांत येतो. स्त्रीच्या स्तनांतील कॅन्सर किंवा कातडीचा कॅन्सर प्रथमावस्थेंत कळल्यास ८० ते ९० टक्के तो बरा होऊं शकतो व त्याचा पुन्हां प्रादुर्भाव होण्याचा संभवहि अत्यंत कमी असतो.

हिंदुस्थानांत दर वर्षी २ लाख माणसें कॅन्सरनें मरतात असा अंदाज आहे. अमेरिकेंतहि इतके लोक कॅन्सरनें मरतात. तेथील लोकसंख्या आपल्या निम्म्यानें असूनहि असें घडतें हें विचित्र वाटतें. पण याचें कारण असें आहे कीं, ज्या उतार वयांत हा रोग बहुधा होतो तेवढ्या वयापर्यंत जगणारीं माणसेंच आपल्याकडे थोडीं असतात! येथील लोकांचें सरासरी वयोमान जसजसें वाढत जाईल तसतसे कॅन्सरचे रोगीहि वाढत जाण्याचा संभव आहे!

"१९३३ सालीं माद्रिद येथें आंतरराष्ट्रीय कॅन्सरविरोधी संघटनेची कल्पना पुढें आली व १९३४ सालीं पॅरिस येथें तशी संस्था Union Internationale Contra Le Cancer या नांवानें स्थापन झाली. ही संस्था व आंतरराष्ट्रीय कॅन्सर कॉंग्रेस या दोन्ही संस्थांचीं समग्र अधिवेशनें दर तीन वर्षांनीं भरतात. १९४७ सालीं कॅन्सरविरोधी कॉंग्रेसच्या सेंट लुई येथील अधिवेशनांत 'आंतरराष्ट्रीय कॅन्सर-रिसर्च-कमिशन' स्थापन झालें. (याच कमिशनचें ५ वें अधिवेशन ता. ३० डिसेंबरला मुंबईत भरलें होतें.) गेलीं दहा वर्षें या कॉंग्रेसमध्यें व कमिशनमध्यें हिंदुस्थाननें खूपच महत्त्वाचा भाग घेतला आहे. टाटा मेमोरिअल रुग्णालयाचे डॉ. खानोलकर हे या कमिशनच्या स्थायी समितीवर आशियाचे प्रतिनिधि म्हणून मूळ निवडले गेले होते व आतां तर ते या कमिशनचे अध्यक्ष असून मूळ संस्थेचे (यूनिअनचे) उपाध्यक्ष आहेत.

"१९४१ पर्यंत हिंदुस्थानांत कॅन्सरसाठीं स्वतंत्र रुग्णालय नव्हतें. मग मुंबईत 'टाटा मेमोरिअल हॉस्पिटल' सुरू झालें. मद्रास येथील 'बर्नार्ड इन्स्टिटयूट ऑफ रेडिऑलजी' आणि कलकत्यांतील 'चित्तरंजन कॅन्सर हॉस्पिटल' या दोन संस्थाहि महत्त्वाचें कार्य करीत आहेत. यांपैकीं टाटा मेमोरिअल हॉस्पिटलमध्यें रोगनिदान व रोगचिकित्सा यांसाठीं लागणारी अगदीं नवीन तऱ्हेची साधनसामग्री आहे. गेल्या दहा वर्षांत तीस हजारांवर माणसें या रुग्णालयांत दाखल झालीं व त्यांपैकीं १८ हजारांच्या रोगाचें निदान कॅन्सर म्हणून करणें शक्य झालें. ५ हजारांवर रुग्णाइतांवर मोठ्या शस्त्रक्रिया करण्यांत आल्या आणि १० हजारांना क्षकिरणचिकित्सेचा व ५ हजारांना रेडिअम-चिकित्सेचा फायदा मिळूं शकला. एकंदर ११ हजार रोग्यांना इस्पितळांतील ८१ खाटांचा लाभ घेतां आला. अर्थातच ही सोय अत्यल्पच आहे. अमेरिकेंतील लोकसंख्या आपल्या निम्म्यानें असूनहि तेथें कॅन्सर इस्पितळें ५६५ आहेत!

## 'कॅन्सर'-तज्ज्ञ डॉ. खानोलकर

'आंतरराष्ट्रीय कॅन्सर-रिसर्च-कमिशन'च्या यंदाच्या बैठकीचे अध्यक्ष व मुंबईतील टाटा मेमोरिअल हॉस्पिटलचे मुख्य संचालक डॉ. वसंत रामजी खानोलकर यांचा वर उल्लेख आलाच आहे. आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या अनेक परदेशीय कॅन्सरतज्ज्ञांनीं डॉ. खानोलकरांचें कार्य मुक्त कंठानें प्रशंसिलें आहे. त्यांचा परिचय ('टाइम्स् ऑफ् इन्डिआ', ३१ डिसें. वरून) पुढें थोडक्यांत दिला आहे :

"डॉ. खानोलकर हे हिंदुस्थानांतील कॅन्सरविषयक संशोधनाचे मूळ मार्गदर्शक आहेत. त्यांचें वैद्यकाच्या इतर शास्त्रांतील कार्यहि महत्त्वाचें आहे. त्यांचें मूत्राशयविषयक संशोधन, रक्ताच्या विविध प्रकारांचें वंशनिष्ठ वर्गीकरण, कातडींतील कॅन्सर-








जन्य फेरफार तसेंच महारोगाविषयींचा इतिहास वगैरे शाखांतील कार्य वैशिष्ट्यपूर्ण आहे.

" डॉ. खानोलकरांचा जन्म क्वेटा येथें एका प्रसिद्ध डॉक्टरच्या कुटुंबांत झाला. उच्च शिक्षणासाठीं ते लंडनला गेले व तेथें त्यांनीं पहिल्या वर्गांत विज्ञानविषयाची पदवी घेतली ( १९१७ ). १९१८ सालीं त्यांनीं वैद्यकशास्त्राची पदवी मिळविली आणि लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेज हॉस्पिटलमध्यें असिस्टंट बॅक्टीरिऑलॉजिस्टची जागा त्यांना मिळाली. १९२३ सालीं त्यांनीं लंडन विद्यापीठाची पॅथॉलॉजी शास्त्राची M. D. ही पदवी मिळविली. तीन वर्षांत ही पदवी मिळवूं शकणारे ते एकटेच होते ! हिंदुस्थानांत ते १९२४ ते-२६ मध्यें ग्रँट मेडिकल कॉलेजांत आणि १९२६ ते-३९ मध्यें जी. एस्. मेडिकल कॉलेजांत प्राध्यापक होते. १९४० पासून कॅन्सरविरोधी संशोधनाला वाहून घेण्याकरितां ते टाटा मेमोरिअल हॉस्पिटलमध्यें आले. त्यांचें तेथील संशोधनकार्य जगप्रसिद्ध आहे. त्यांना 'आंतरराष्ट्रीय कॅन्सर-संशोधन-कमिशन 'चे अध्यक्ष नेमण्यांत केवळ त्यांचा वैयक्तिक सन्मान नसून तो हिंदुस्थानचाच सन्मान होय. आंतरराष्ट्रीय कॅन्सरविरोधी संघटनेचे ते उपाध्यक्षहि आहेत.

" भारतीय कॅन्सर-संशोधन-केन्द्राचा प्रारंभ म्हणजे खानोलकरांच्या स्वप्नांना मिळालेला मूर्तिमंत आकारच होय. त्यांचा या बाबतींतील मिशनरी तऱ्हेचा उत्साह आणि उद्योगप्रियता हिंदुस्थानांत तरी अक्षरशः अद्वितीय आहेत ! डॉ. खानोलकर यांच्या प्रभावी मार्गदर्शनाखालीं आणि आंतरराष्ट्रीय संशोधकांच्या साहाय्यानें व सहानुभूतीनें हें केन्द्र उत्कृष्ट कार्य करील याबद्दल संशय राहत नाहीं. "

## ' धम्मपदां 'तील निर्मळ समभाव

आचार्य विनोबा नुकतेच काशीला असतांना त्यांना सारनाथच्या ' महाबोधि-सभे 'च्या मंडळींनीं बोलावून त्यांचें हार्दिक स्वागत करून त्यांना ' धम्मपद ' हें बौद्धधर्माचें सुप्रसिद्ध पुस्तक भेट म्हणून दिलें. या निमित्तानें ' धम्मपदा 'च्या विचारसौन्दर्यावर विनोबांनीं एक सुन्दर प्रवचन केलें आहे. त्यांतील कांहीं भाग ' सेवका 'च्या जानेवारीच्या अंकांतून पुढें उद्धृत केला आहे :

" ' धम्मपद '—लहानसें पुस्तक. माझ्या चेताचें आणि विचारांनीं भरलेलें. सोपें आणि सरळ. तोंडांत टाकलें कीं विरघळून जायचें. फक्त ४२३ श्लोक सव्वीस अध्यायांत वांटलेले. गीतेहूनहि लहान... गौतमबुद्धाच्या विहारभूमींतच माझाहि संचार चाललेला आहे. अशा वेळीं हा सांगाती फार सुखाचा झाला आहे...

" ' धम्मपदा 'च्या पहिल्या अध्यायाला यमकवर्ग असें नांव दिलें आहे. यमक म्हणजे श्लोकांची जोडी असा भावार्थ आहे. याला संस्कृतांत नेहमींचा शब्द ' युग्मक '. पण अशीं युग्मकें ' धम्मपदा 'च्या केवळ पहिल्या अध्यायांत नसून, सबंध पुस्तकभर ठिकठिकाणीं आहेत. गीतेंत युग्मकें थोडीं आढळतात. श्लोकांचीं त्रिकें अधिक आहेत. तत्त्वविवेचनाला त्रिकें अनुकूल पडतात : ( १ ) माणूस मरणारा आहे. ( २ ) विनोबा माणूस आहे. ( ३ ) तस्मात् विनोबा मरणार आहे—.हें त्रिकाचें उदाहरण झालें. ही असली तस्मात्-पद्धति जिरवून गीता गोड झाली आहे. ' धम्मपदां 'त तस्मात्—किस्मात् कांहीं नाहीं. त्यांत मुख्यतः नीतिविवेचन आहे. नीतिविवेचनांत सार-असार, बरें-वाईट, सत्य-असत्य असल्या जोड्या उभ्या होतात. त्यामुळें युग्मकें नीतिविचाराला मानवतात.

" गौतमबुद्ध हिंदुधर्मांत जन्मास आले, हिंदुधर्मांत वाढले आणि त्यांतच मुरले. त्यांना आपला सवतासुभा काढायचा नव्हता. धर्मविचारांची शुद्धि करावयाची होती, ती त्यांनीं केली...सबंध ' धम्मपदां 'त असें एकहि वाक्य आढळलें नाहीं कीं, जें मला हिंदु या नात्यानें मानवणार नाहीं...

" प्राचीन भारतांत कांहीं काळ वैदिकांची ब्राह्मण संस्कृति, जैनांची श्रमण संस्कृति आणि बौद्धांची भिक्षु संस्कृति अशा जणूं तीन वेगवेगळ्या संस्कृती चालल्या. त्यांचा संघर्षहि दीर्घ काळपर्यंत चालला होता. पण धम्मपदांत त्या संघर्षाचा मागमूसहि नाहीं. सगळीकडे निर्मळ समभाव दिसून येतो.. गाथा १४२ काय म्हणते पाहा : ' जो








कोणाहि जीवाला दंड देत नाहीं, तो ब्राह्मण आहे, तो श्रमण आहे, तो भिक्षु आहे. ... ' (भगवद्-गीतेंतल्याप्रमाणेंच 'धम्मपदां 'तहि आदर्श पुरुषांचीं वर्णनें ठिकठिकाणीं आलीं आहेत.)

" सहावा अध्याय पंडितलक्षण, सातवा अर्हतलक्षण, चौदा बुद्धलक्षण, एकोणीस धार्मिकलक्षण, पंचवीस भिक्षुलक्षण आणि सव्वीस शेवटचा अध्याय ब्राह्मण-लक्षण अशीं सहा ठिकाणीं आदर्श पुरुषांचीं लक्षणें मांडलीं आहेत. लक्षणें सगळीं मिळून एकच आहेत. यांतील अर्हत हें जैन नांव आहे. ब्राह्मण वैदिक आहे. दोन्हीं नांवांचा गौतमबुद्धांनीं आदर केला आहे. 'धम्मपदा 'चा अभ्यासी सर्वधर्मसमभावच राखूं शकतो.

" शेवटचा अध्याय ब्राह्मण-लक्षणाचा करून 'ब्राह्मण ' शब्दाविषयीं अत्यंत गौरव दर्शविला आहे.... 'जन्मानें आणि गोत्रानें कोणी ब्राह्मण होत नाहीं. ज्याच्या ठायीं सत्य आणि धर्म निवास करतात तो ब्राह्मण ' असेंहि एक विवरण सादर केलें आहे. "

## आफ्रिकन नेते ' जोमो ' केन्याटा

पूर्व आफ्रिकेंतील केनया नांवाच्या ब्रिटिश वसाहतींत आज फार मोठी धामधूम चालू आहे. सबंध आफ्रिकेंतच एक स्वाभिमानाची लाट फार जोरांत उसळली आहे, त्यांतून केनयाहि वगळला गेलेला नाहीं. तेथील जनतेची राष्ट्रीय संस्था 'केनया आफ्रिकन युनियन ' आहे. त्या संस्थेचे श्रेष्ठ पुढारी मि. जॉन्स्टन उर्फ जोमो केन्याटा हे आहेत. केनया आणि इतर ब्रिटिश वसाहतींचें एक संघराज्य स्थापण्याचा ब्रिटिशांचा विचार चालू आहे. परंतु त्यामुळें केवळ साम्राज्यवाल्यांचे हातच बळकट होण्याचा संभव आहे असें तेथील जनतेला वाटलें. ही जनता मुख्यतः किकूयू नांवाच्या जमातींतील आहे. आज या किकूयूंतील हजारों माणसें ब्रिटिशांच्या तुरुंगांत आहेत—स्थानबद्ध आहेत. 'माव् माव् ' (Mau Mau) नांवाची या किकूयूंची एक गुप्तसंस्था दहशतवादाचा अवलंब करून केनयांतील गोरे मळेवाले जमीनदार व ब्रिटिश सत्ता यांना उलथून पाडण्याचा कट करीत आहे, अशी घोषणा तेथील ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं केली आहे. 'माव् माव् ' संघटनेच्या नांवानें अनेक भयानक गोष्टी प्रसिद्ध केल्या जात आहेत. या 'माव माव् ' संघटनेशीं संबंध ठेवून हिंसक चळवळीला पाठिंबा देत असल्याच्या आरोपावरून जोमो केन्याटा आणि इतर कांहीं पुढारी यांच्यावर फौजदारी खटले भरण्यांत आले आहेत. इंग्लंडमधून मि. प्रिट हे प्रसिद्ध कायदेपंडित केन्याटांचे वकील म्हणून काम करावयास गेले आहेत. त्यांच्या कामांत किती तरी अडथळे आणले जात आहेत. त्यांच्यावर कोर्टाची बेअदबी केल्याचा आरोप कसा ठेवला गेला होता, पण त्यांतून ते कसे दोषमुक्त झाले, तो इतिहास ताजा असून सर्वांच्या परिचयाचा आहे. आपल्याकडूनहि दिवाण चमनलाल हे खटल्यासाठीं गेले होते. अशा प्रकारें आंतरराष्ट्रीय प्रसिद्धि मिळालेल्या या आफ्रिकन पुढाऱ्याविषयीं माहिती 'भारतज्योति '-(११।१।५३) व 'इलस्ट्रेटेड वीकली ' (११।१।५३), यांवरून पुढील संकलन एकत्रित करून दिलें आहे :

" केन्याटा यांना त्यांचे अनुयायी 'जोमो ' म्हणजे Burning Spear—'जळता भाला '—या नांवानें ओळखतात. कारण त्यांच्या मतें केनयावासींच्या स्वातंत्र्याचा मार्ग केन्याटांनींच उजळून टाकला आहे. त्यांच्या प्रयत्नांमुळेंच अनेक अडचणी असतांहि सामान्य जनतेंत शिक्षणाचा फैलाव झाला आहे. पूर्व आफ्रिकेंत प्रत्यक्षपणें वंशभेदाचा कायदा नसला तरी व्यवहारांत तेथील जनतेला अलगपणेंच वागविलें जातें. सर्वांत चांगली जमीन व जागा युरोपिअनांच्या हातीं आहे; युरोपिअन, आशिअन व आफ्रिकन यांचीं उपाहारगृहें वेगवेगळीं आहेत. परंतु मुख्य गोष्ट म्हणजे ही जनता स्वतः-च्याच देशांत गुलामाचें जिणें जगत आहे—

" केनयाचा विस्तार २,२४,९६० चौरस मैल आहे. प्रदेश अत्यंत निसर्गसुंदर व समृद्ध आहे. जमीन सुपीक आहे व खनिज संपत्ति विपुल आहे. दक्षिण केनयाचा भाग तेवढाच औद्योगिक दृष्टया सुधारलेला आहे. त्यांतील समुद्रालगतचा भाग (कोंकणासारखा) सखल असून पठाराचा भाग ३००० ते १०००० फूट उंचीचा आहे...

" अशा या देशांतील आफ्रिकन किकूयू जनतेचे








पुढारी केन्याटा 'जोमो' हे आहेत. मुळांत 'जॉन्स्टन्' हें नांव त्यांना स्कॉटिश मिशननें दिलें होतें. केन्याटा हे पोरके असतांनाच मिशननें त्यांना वाढविलें व पुढें एका निपुत्रिक युरोपिअन कुटुंबानें त्यांच्याबद्दल प्रेम दाखविलें. वयाच्या १८ व्या वर्षीं (१९२२ सालीं) केन्याटा पहिल्या आफ्रिकन संस्थेचे—'किकूयू सेंट्रल ऑर्गनायझेशन'चे अध्यक्ष झाले. १९२८ सालीं त्यांनीं एक इंग्रजी वृत्तपत्र सुरू केलें व त्यांत युरोपिअनांबद्दल टीका येऊं लागली! एक वर्षानें ते ब्रिटनमध्यें गेले आणि सिड्ने वेब व रॅम्से मॅक्डोनल्ड यांच्या कानीं त्यांनीं केनयांतील आफ्रिकनांचीं दुःखें घातलीं. ते १७ वर्षें तेथें राहिले व आफ्रिकनांचीं दुःखें वेशीवर टांगण्याचें काम त्यांनीं केलें. ते 'लंडन स्कूल ऑफ् इकॉनॉमिक्स' या संस्थेचे एक तेजस्वी विद्यार्थी गणले गेले. १९३८ सालीं त्यांचें अत्यंत लोकप्रिय पुस्तक 'फेसिंग माउण्ट् केनया' हें प्रसिद्ध झालें.

"मध्यंतरीं केन्याटांचें प्रेम एका ब्रिटिश युवतीवर बसलें व त्या युवतीनें महायुद्धाच्या धामधुमींत १९४२ सालीं त्यांच्याशीं लग्न केलें. त्या वेळीं केन्याटा 'लंडन स्कूल ऑफ ओरिएन्टल लँग्वेजेस्' या संस्थेंत प्राध्यापक होते व त्यांच्या पत्नी एड्ना ग्रेस क्लार्क या एका 'लंडन स्कूल' मध्यें शिक्षिका होत्या.—ते एकदां म्हणाले कीं, महात्मा गांधींनीं ब्रिटिशांना 'हिंद छोडो' म्हणून बजावलें, त्याच अर्थानें मी ब्रिटिशांना केनया सोडावयास सांगत आहे—.

"केनयांत परत येतांच त्यांनीं समाजांत खालच्या थरापासून जागृति उत्पन्न करण्यासाठीं शिक्षणाचें कार्य व इतर विधायक कार्यें हातीं घेतलीं. त्यांनीं शिक्षक तयार करण्यासाठीं एक अध्यापक-विद्यालय सुरू केलें व त्यांत तयार झालेल्या शिक्षकांना स्वतंत्रपणें शाळा उघडण्याला पाठविलें. केन्याटांच्या प्रयोगाचें हें यश केनया सरकारला बाधक झालें. सरकारनें केन्याटांच्या शाळांना मिळणारी सरकारी ग्रॅन्ट बंद केली. तरीहि १८० शाळांनीं स्वतंत्रपणें आपलें अस्तित्व टिकविलें. 'माव् माव्' संघटनेवर सरकारनें शस्त्र उगारल्यानंतर या सर्व शाळा सक्तीनें बंद करण्यांत आल्या.

"केन्याटांची अभ्यासाची खोली वेगवेगळ्या प्रसिद्ध व्यक्तींचीं छायाचित्रें व ग्रंथ यांनीं पुनीत झालेली आहे. प्रमुख ठिकाणीं गांधीजींचें स्वतःच्या स्वाक्षरीचें एक छायाचित्र आहे. पुस्तकसंग्रहांत नेहरू, वेल्स्, शोपेनहॉवर, टागोर, चेस्टर्टन् वगैरेंचे ग्रंथ आहेत. 'फेसिंग् मॉउन्ट केनया' या त्यांच्या ग्रंथाच्या इंग्रजी व इतर अनेक भाषांतील आवृत्त्या तेथें आहेत. त्या ग्रंथांतील पुढील उद्‌गार केन्याटांच्या वृत्तीचे द्योतक आहेत: 'आफ्रिकनांना सुसंस्कृत करण्याचे प्रयत्न चालू आहेत, पण ते चालू असतांना आफ्रिकनांच्या मनांत भीति व शंका यांचें काहूर माजलें आहे...(स्वतःच्या जुन्या व नव्या युरोपीय) अशा दोन प्रवाहांमध्यें त्यांचें तारू आदळत चाललें आहे. गतकालांत असे सुधारणेचे प्रयोग पुष्कळ झाले व ते सर्व अशा कल्पनेनें झाले कीं, आफ्रिकनांची स्वतःची संस्कृति आदि-मानवाची जुनी असून ती केवळ वस्तुसंग्रहालयांत जीर्ण अवशेष म्हणून ठेवण्याच्या लायकीची आहे. पण आतां युरोपिअनांनीं हें ओळखलें पाहिजे कीं, आपल्याला आफ्रिकनांपासूनहि कांहीं तरी शिकण्यासारखें आहे.'"

## मालदिवचें सर्वांत लहान लोकसत्ताक

लखदीव-मालदीवनामक द्वीपसमूहापैकीं लखदीव बेटें आतां हिंदुस्थानचा भाग झालेलीं आहेत. मालदीव बेटें ब्रिटिशांच्या आधिपत्याखालीं होतीं. आतां या मालदीव बेटांतहि लोकसत्ताक राज्य स्थापन झालें आहे. हें आशियांतील सर्वांत लहानसें लोकसत्ताक राष्ट्र. ह्याविषयींची पुढील माहिती आर. पी. सूद यांच्या 'भारतज्योति'तील (४ जाने.) लेखामधून संकलित केली आहे:

"१२००० छोट्या बेटांचा हा 'मालदीव' द्वीपसमूह सिलोनच्या नैर्ऋत्य दिशेस ४०० मैलांवर हिंदी महासागरांत आहे. मुळांत लखदीव-मालदीव बेटें 'लक्षद्वीप' नांवानें सर्वांना ज्ञात होतीं. सांस्कृतिक दृष्ट्या या दोन्हीं द्वीपसमूहांत एकवाक्यता आहे. खिस्ती शकाच्या नूतन वर्षदिनीं हें चिमुकलें राष्ट्र लोकसत्ताक बनलें. त्याआधीं एक वर्ष तेथील सुलतानाची राज्यसत्ता संपुष्टांत








आली होती व तेथें राष्ट्राध्यक्षाची निवडणूक झालेली होती.

" या १२००० बेटांपैकीं केवळ सुमारें ३०० बेटांतच वसति असून, बाकीचीं बेटें नारळी-पोफळीच्या बागांनीं भरलेलीं आहेत. एकंदर लोकसंख्या ९३००० असून ती धर्मानें मुसलमान आहे. (फक्त १ माणूसच तेथें खिस्ती आहे !) धर्मानें मुस्लीम असूनहि तेथें स्त्रीस्वातंत्र्य दिलेलें आहे. पडदा कायद्यानें बंद केलेला आहे. सार्वत्रिक मतदानाचा हक्क बहाल केलेला आहे....गेलीं ८३६ वर्षें येथें सुलतानाची सत्ता होती. ११ व्या शतकांत प्रवासी अरबी मुल्लांनीं सुलतानाला इस्लाम धर्माची दीक्षा दिली. कांहीं काळापासून येथील परंपरागत सुलतानशाही गेली आहे. सुलतान निवडले जात असत. शेवटचा सुलतान गतवर्षी वारल्यावर त्याचा पुतण्या अमिन दिदी हा मुख्यप्रधान झाला व तोच आतां लोकसत्ताकाचा अध्यक्ष निवडला गेला आहे.

" १७ व्या शतकापासून सिलोनमधील ब्रिटिश सत्ताधिकाऱ्यांशीं या बेटांचे संबंध मांडलिकत्वाचे चालत आलेले आहेत. संरक्षणाबाबत ब्रिटिश सत्तेचें अधिराज्य येथें असून बाकीच्या बाबतींत मात्र राज्य स्वतंत्र आहे. पोर्तुगीजांचे येथें पाय रोवण्याचे प्रयत्न फसले. पण मलबारांतील मोपला चांच्यांनीं त्रास दिल्यामुळें मालदीवच्या सुलतानानें सिलोनमधील ब्रिटिशांची मदत घेतली.

" मालदीव बेटांचें लष्करी दृष्ट्या फार महत्त्व आहे. गेल्या महायुद्धांत येथील अद्दु बंदरांत समुद्रावरील जहाजें व विमानें थांबण्याचा महत्त्वाचा तळ होता. त्रिंकोमालीचा संबंध आरमारी काफला जरूर तर येथें हालविण्याची दोस्तांची तयारी होती.

" येथील लोक बुद्धिमान् आणि मेहनती आहेत. ते स्वतःच आपलें धान्य पिकवतात, आपलीं वस्त्रें व चटया विणतात आणि स्वतःच आपल्या होड्या-जहाजें बांधतात. त्यांचा मुख्य व्यापार काथ्या, कवट्या, नारळ, खोबरें, तसेंच सुके मासे व कांसवाचीं कठीण कवचें यांची निर्यात हा होय. त्यांच्या 'टोटस' म्हणजे बागांमध्यें ते केळीं, हलकीं धान्यें व इतर पदार्थ यांची पैदास करतात. येथील सर्व लोकांना देवभाषा[?]चीला जरूर तेवढी भाषा लिहितां वाचतां येते. कित्येक लोक अरबी भाषा सफाईनें बोलतात. त्यांची देशी भाषा सिंहली भाषेची एक पोट भाषा असून, आज ती अरबी लिपींत लिहिली जाते.

" 'माले' नांवाचें गांव या द्वीपसमूहाची राजधानी आहे. येथेंच पूर्वीचा सुलतान व आतांचा अध्यक्ष राहतो. बहुतेक सर्व श्रीमंत व्यापारी येथेंच राहतात. मालेशहरींच फक्त पोस्ट आहे. बकरें हाच प्राणी येथें पाळतात. त्याचें दूध व मांस हें खाद्य असतें. येथें प्राण्यावरून माणसांचीहि वाहतूक चालते. येथें चाकांचीं वाहनें नाहींत. सायकलींनाहि बंदी आहे! प्रत्येकजण आपल्या घरासमोरील रस्ता स्वच्छ ठेवतो.

" येथें प्रथम वसाहत केव्हां झाली याचा शोध लागत नाहीं. पण १००० वर्षांपासून बाह्य जगाशीं या बेटांचा संबंध आहे हें निश्चित. आल्बेरुनीनें या बेटांचा उल्लेख केलेला आहे : तो मालदीव बेटांना 'दिवाह् कुशाह्' म्हणजे 'कवडींचीं बेटें' म्हणतो आणि लखदीव बेटांना 'दिवाह् कान्बार' म्हणजे 'काथ्यांचीं बेटें' म्हणतो. आल्बेरुनीनें असेंहि म्हटलें आहे कीं, मुंबा मुलायक नांवाच्या अरबी मुल्लानें सुलतानाला मुस्लीम धर्माची दीक्षा दिली. या मुल्लाची कबर येथें अजूनहि आहे व लोक त्या कबरीचा सन्मानहि खूप करतात. १४ व्या शतकांत इब्न बाटुटा नांवाचा दुसरा मुस्लीम प्रवासी तेथें गेला. त्यापूर्वी अनेक पिढ्या तेथें वस्ती होती असें म्हटलें आहे. या इब्न बाटुटानें एका मालदिवी रूपवतीशीं लग्न केलें व त्यांना एक मुलगाहि झाला. नंतर तो परत जावयास निघाला असतां मुलाला बरोबर घेऊं लागला. पण त्याच्या मालदिवी बायकोनें विरोध केला. शेवटीं प्रकरण सुलतानापर्यंत गेलें. सुलतानानें त्याला खूप वस्तू भेटीदेखील देऊन समजूत घातली. हा सर्व वृत्तांत बाटुटाच्या स्मृति-वृत्तांतांत नमूद केलेला आहे..."











अनुक्रमणिका






